व्हीनस पुरवणी वाचनमाला : क्र. ६

चिं. वि. जोशी

# गाळीव रत्नें

संपादक
डॉ. द. न. गोखले,
एम्. ए. (ऑ.), बी. टी., पीएच्. डी.

मूल्य रु. १-८-०

व्हीनस प्रकाशन : पुणें

# निवेदन

१९५४ मध्ये माध्यमिक शाळांच्या बदललेल्या अभ्यासक्रमास अनुसरून आम्ही ही नवीन पुरवणी-वाचन-माला तयार करीत आहोत. भारत देश स्वतंत्र झाल्यानंतर जीवनातील सर्व अंगाना परिपुष्ट करण्याचे सतत प्रयत्न सुरु झाले आहेत. या देशाच्या वैभवाचा सर्व इमला ज्यांच्या खांद्यांवर आज ना उद्या येणार आहे अशा आजच्या कोवळ्या विद्यार्थ्यांच्या मनाच्या जोपासनेचें कार्य या दृष्टीने फारच महत्त्वाचें आहे. या नव्या पिढीच्या शिक्षणाबद्दल सर्वत्र चर्चा होत आहे. जुनें बदलून टाकावें असें सर्वत्र बोललें जात आहे; पण नेमकें नवें काय आकारास आणावें याबद्दल मात्र अजून निश्चिति झालेली दिसून येत नाही. जीवनाचा सर्वांगीण विकास व्हावा म्हणून शिक्षणाच्या कल्पना आज मोठ्या विस्ताराने वाढीस लागल्या आहेत. विद्यार्थ्यांचें अनुभवक्षेत्र विस्तृत व्हावें, नव्या नव्या प्रश्नाची त्याना माहिती व्हावी, व नव्या ज्ञानाची भूक त्याच्यात निर्माण व्हावी म्हणून सतत प्रयत्न चालू आहेत. शिक्षणाची व्यापकताहि दिवसेंदिवस वाढत आहे. या देशांतील बहुसंख्य जनता आता शिक्षणाच्या मार्गावर वाटचाल करूं लागलेली आहे. तेव्हा या संक्रमणाच्या काळात विद्यार्थीवर्ग व सामान्य वाचक साधारणपणें काय वाचावें या प्रश्नातच गोंधळून जाण्याची शक्यता आहे. मनाची व शरीराची झपाट्याने वाढ ज्या वयांत होत असते त्याच वयात विद्यार्थ्यांच्या मनाच्या विकासाच्या दृष्टीने कांही सकस व सद्विचारसंपन्न वाङ्मय त्यांच्या हातीं देण्यासाठी नव्या अभ्यासक्रमास अनुसरून आम्ही ही पुरवणी-वाचन-माला तयार करीत आहोत. लघुकथा, कादंबऱ्या, एकांकिका, प्रवासवृत्त, चरित्रें इत्यादि विविध वाङ्मय-प्रकारांची निवड या मालेसाठी जाणीवपूर्वक केलेली आहे. नामवंत लेखकांच्या व व्यासंगी शिक्षकांच्याच साह्यावर या मालेची उभारणी झालेली असल्याकारणाने विद्यार्थ्यांना ती अतिशय उपयुक्त होईल असें वाटतें. प्रस्तुतच्या मालेतील पुस्तकें सर्व दृष्टींनी परिपूर्ण व सर्वांगसुंदर बनविण्याचा प्रयत्न आम्ही केलेला आहे.

— संपादकमंडळ

— प्रकाशक

# प्रस्तावना

( मुलामुलींसाठी )

आपल्या मराठी वाङ्मयात विनोदी लेखन करणारे अनेक लेखक प्रसिद्ध आहेत. कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी या लेखकांची थोर परंपरा सुरू करून दिली. या परंपरेत कै. रा. ग. गडकऱ्यांसारखे प्रतिभाशाली लेखक होऊन गेले आणि आचार्य प्र. के. अत्रे, कॅप्टन गो. ग. लिमये, श्री. शामराव ओक, श्री. चि. मा. दा. पटवर्धन, श्री. ना. धों. ताम्हनकर वगैरे लहानमोठे लेखक या परंपरेत आज विराजत आहेत. आज विराजणाऱ्या या लेखकांतच प्रा. चिंतामण विनायक जोशी यांचा समावेश होतो आणि त्यांच्या विनोदांतील विविध गुणांमुळे ते एक अग्रगण्य विनोदकार म्हणून ओळखले जातात. त्यांच्या विनोदाच्या खाणींतून कितीतरी तेजस्वी व रंगीबेरंगी रत्नें मराठीच्या भांडारात आजवर जमा झालीं आहेत. त्या रत्नांपैकीच दहा "गाळीव रत्नें" मी या पुस्तकाच्या सुंदर डबींत घालून तुम्हांला भेट देत आहे. तुमच्यासारख्या रत्नांना हीं 'गाळीव रत्नें' खास आवडतील अशी माझी खात्री आहे.

मला माहीत आहे, की तुम्हाला गोष्टी फार आवडतात. गोष्टी ऐकताना तुमचे डोळे कसे विस्फारतात, तुमचें वेळेचे भान कसें हरपतें आणि

तुमचीं तोंडें कशीं उघडीं राहातात, तें मीं पाहिलेलें आहे. म्हणून या पुस्तकांत मीं गोष्टींचीच निवड केली आहे. विनोदी लेखनांत साऱ्या गोष्टीच असतात, असें नाही त्यांत निबंध किंवा लेख यांसारखेंहि लिखाण असतें. विशेषत: कोल्हटकरांनी आपल्या 'सुदाम्याच्या पोह्यां'त व गडकऱ्यांनी आपल्या 'संपूर्ण बाळकरामां'त असें निबंधवजा विनोदी लिखाण केलें आहे. प्रा. जोशी यांनीहि थोडेसें तसें लिहिलें आहे. पण आपले मामा कॅ. लिमये यांचा कित्ता गिरवून त्यांनी विनोदी गोष्टीच मुख्यत: लिहिल्या. तेव्हा, गोष्टी उपलब्ध असतांना मी तुमच्यासाठी निबंध कशाला निवडीन? तुमच्यासारख्या गोष्टींवेल्हाळांसाठी मी त्यांच्या गोष्टीच भेटीदाखल आणल्या आहेत. त्यातून, या गोष्टी साध्या नाहीत. तुम्हांला जी गंमतजंमत किंवा जो विनोद फार फार आवडतो तो विनोद या गोष्टींच्या ओळीओळींत टन्च भरलेला आहे. या विनोदी गोष्टी आहेत. तेव्हा, खाऊच्या पुड्यावर तुमच्या लहान भावंडांनी तुटून पडावें त्याप्रमाणे या विनोदी गोष्टींवर तुम्ही तुटून पडाल आणि त्या वाचून केव्हाच फस्त कराल, याबद्दल मला मुळीच शंका नाही.

विनोद झाला की आपण कां हसतों, हें तुम्हांला माहीत आहे का? आपणांला कांही अनुचित दिसतें, म्हणजेच अनौचित्याचें दर्शन घडतें, म्हणून आपण हसतों. एक शिक्षक शनिवारीं सकाळीं शाळेंत जाण्याच्या घांदलींत होते; पण कांही केल्या त्यांना टोपीच सापडेना. त्यांनी टोपी खूप शोधल्यावर त्यांच्या पत्नीची नजर त्यांच्या डोक्याकडे जाऊन ती म्हणाली, 'हा काय बाई विचित्रपणा! टोपी तर आपल्याच डोकीवर दिसतीय मला! अन् घरभर धुंडायची कशाला ती?' तेव्हा शिक्षक डोक्यावरची टोपी चाचपून उद्‌गारले, 'वा, छान! सांगितलंस म्हणून बरं. नाही तर, बोडकाच शाळेला गेलों असतों'—या चुटक्यांत, डोक्यावर टोपी असतां शिक्षकांनी ती शोधणे, हें पहिलें अनौचित्य आणि डोक्यावर टोपी असतां 'मी बोडकाच शाळेला गेलों असतों' असें म्हणणें, हें दुसरें अनौचित्य. हें अनौचित्य दिसलें की विनोदनिर्मिति होते आणि आपण हसतों. विनोदी लेखक आपल्या भोवतालचें जग जसें कांही काकदृष्टीने बघत असतो. कोठे

दोष, फट, न्यून, व्यंग, विसंगति दिसली, म्हणजेच अनौचित्य दिसलें, की तें तो काळजीपूर्वक टिपून घेतो आणि त्याची कौशल्यपूर्ण मांडणी आपल्या लिखाणात करतो. तो आपल्या कल्पनेतूनहि नाना प्रकारच्या अनौचित्यपूर्ण चिजा निर्माण करतो व त्यांचेंहि प्रदर्शन आपल्या लिखाणांत मांडतो. मिळून त्याचे लिखाण म्हणजे अनौचित्याचा अजबखानाच बनतो. हे अनौचित्य ध्यानात आल्यामुळेच, आपण त्याचे लिखाण वाचीत असतां कधी गाल किंचित् वाकडा करतो, तर कधी पोट धरधरून खदखदत राहातों. मात्र हें लक्षात ठेवा, की विनोदातील अनौचित्य सौम्य हवें तें तीव्र झाले तर आपणाला हसू न येतां रडूं येईल किंवा राग येईल. आरामखुर्चीच्या कापडांतील दांडू हलकेच काढून ठेविला व खुर्चीवर निःशंकपणें येऊन बसलेला दोस्त हापटला तर आपण हसू; पण हापटून त्या दोस्ताचे हाड मोडले तर? तर न हसतां आपण विषाद मानू. बसणारे आपणच असू तर मार जास्त लागल्यास आपण रागावू. सारांश, विनोदांतील अनौचित्यदर्शन अशा कुशलपणें करावें लागतें, की हसू तर फुटावें पण असू गळू नयेत, किंवा रागहि येऊ नये.

अनौचित्य शोधण्याच्या उद्योगात असता विनोदी लेखकाचे लक्ष साहजिकच समाजांतील अनेक अनुचित गोष्टींकडे किंवा दोषांकडे बहुधा वेधले जातें. त्यामुळे ते दोष तो आपल्या लिखाणांत मांडतो व त्यांतील हास्यास्पदता वाचकांना जाणवून देतो. वाचकांना हास्यास्पदता जाणवली, की ते हसतात व हसतां हसतां दोष टाकून देऊन सुधारू लागतात. अशा रीतीने विनोदांतून समाजसुधारणेला हातभार लागतो. मराठींतील विनोदाचे आद्य आचार्य श्री. कोल्हटकर किंवा त्याचे शिष्यवर श्री. गडकरी यांनी या प्रकारें सामाजिक दोष दाखवून समाजसुधारणेकडे विनोदाचा उपयोग केला आहे. शिमग्याचा सण, बालावृद्धविवाह, गवयांचे आकस्ताळे हावभाव नि छांदिष्ट स्वभाव, हुंड्याची चाल, काव्यविषयक खुळचट कल्पना वगैरे सामाजिक दोषांमधील हास्यास्पदता त्यांच्या लिखाणांत स्पष्ट झाली आहे आणि ते दोष दूर होण्यास मदत झाली आहे. कोल्हटकर किंवा गडकरी यांच्याप्रमाणे सुधारकांचा पक्ष घेऊन समाजांतील दोषांवर विनोदाचें गोड

हत्यार चालविण्याचा विडा प्रा. जोशांनी उचललेला नाही. पण तरीहि समाजाच्या कल्याणाची काळजी मनांत वावरत असल्याने सामाजिक दोषां-वर विनोदाचे प्रहार करण्यापासून ते अगदी अलिप्तहि राहिलेले नाहीत. " आपल्या थट्टेच्या योगें जनतेचें कल्याणच करावयाचें हा नारदाचा बाणा प्रत्येक सत्त्वशील विनादप्रिय मनुष्याचे अंगीं बाणला पाहिजे. "—असें ते एका ठिकाणीं म्हणतात. त्याप्रमाणे काही समाजदोषांवर त्यांनी आपला विनोद केव्हा केव्हा आधारलेला आहे, असें या पुस्तकात तुम्हांला आढळून येईल. उदाहरणार्थ, ' स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग ' या गोष्टींत बेजबाबदार वक्ते, नालायक अध्यक्ष, दिखाऊ भाषणें, खोटे निरोपसमारंभ वगैरे दोष उघड करून हास्य उत्पन्न केलें आहे; ' गुड्याभाऊचें दुखणें ' या गोष्टींत डॉक्टरांच्या धंद्यांत माळ्या शहरांतून चालणारी फसवेगिरी उजेडांत आणून विनोद निर्मिला आहे, —आणि ' वशिला लावण्याची सक्त मनाई ' या गोष्टींत आपण वशिल्याविरुद्ध एकीकडे बोलत असतां दुसरीकडे वशिलेबाजी कशी चालवतों तें दाखवून विनोद साधला आहे. प्रा. जोशी, कोल्हटकर-गडकऱ्याप्रमाणे सुधारकांच्याच पक्षाला बांधलेले नाहीत. त्यामुळे जुन्या सामाजिक दोषांवर किंवा सनातन्यांच्या आचारविचारांवर तेवढी टीका करावयाची आणि नवीन सामाजिक दोषांकडे किंवा सुधारकांकडे दुर्लक्ष करावयाचें हा एकांगीपणा त्यांच्या हातून घडला नाही. जुन्यानव्यांतील दोष त्यांनी सारख्याच निःपक्षपातीपणाने विनोदासाठी योजले आहेत. ' स्टेशनस्टाफच्या मेजवानी 'त त्यांनी खोट्या सनातन्यांची खरपूस थट्टा केली आहे; पण ' स्पष्टवक्तेपणाच्या प्रयोगां'त त्यांनी जी कुमारी तरुणीबाईची थट्टा केली आहे ती स्पष्टवक्त्या नव्या सुधारकांचीच आहे. तुम्हीं त्यांचें आणखी वाङ्मय वाचलें आणि ' मुशियन वाङ्मयाचा परिचय ' वगैरे लेख तुमच्या दृष्टोत्पत्तीस आले, की सुधारकांची रेवडीहि ते कशी खुमासदार उडवतात, तें तुमच्या नीट लक्षांत भरेल.

समाजांतील दोषांपेक्षा व्यक्तीच्या स्वभावांतील दोष दाखवून त्यांतील अनौचित्यामधून विनोद उत्पन्न करावा, याकडे प्रा. जोशांचें विशेष लक्ष आहे. कित्येक विनोदी लेखक व्यक्तीच्या स्वभावांतील अनौचित्य दाख-

विण्यासाठी एखादें विशेष पात्र निर्माण करतात. त्या पात्राच्या स्वभावांत अशी गोम, अशा फटी, अशा विसंगति, अशीं बिंगें ते ठेवतात, की त्यांमुळे त्याचें बोलणेंचालणें विनोदपूर्ण व्हावें. कोल्हटकरांनी याप्रमाणे बंडूनाना व पांडूतात्या हीं पात्रें उत्पन्न केलीं आहेत. गडकऱ्यांनी टकी, बाळकराम व तिंबूनाना हें त्रिकूट निर्माण केलें आहे. —आणि ताम्हनकरांनी दाजी ही वल्ली जन्माला घातली आहे. प्रा. जोशांची चिमणराव-गुंड्याभाऊची दुक्कल या दृष्टीने पाहाण्यासारखी आहे. या पुस्तकातील ६—७ गोष्टींत या विनोदी दुकलीशीं तुमची थोडीबहुत जानपछान होईल. चिमणराव भोळसर आहे पण त्याला दुसऱ्यांना बनविण्याची हौस आहे. तो वक्ता आहे पण काय बोलावें याचें तारतम्य त्याला नाही. मोठ्या गोष्टी कराव्या अशी त्याच्या मनांत ऊर्मि आहे पण ध्येयोपासनेलाहि व्यवहाराच्या मर्यादा असतात, हें त्याला समजलेलें नाही. विनोद करण्याची हौस त्याला आहे पण विनोद गळ्यात येऊं न देण्याची दक्षता त्याच्यापाशी नाही. त्याचा जोडीदार गुंड्याभाऊ दाडेकर नांवाप्रमाणे गुंडोबा नि दांडोबा आहे. खच्चून खावें आणि झोंडपणा करावा हा त्याचा खाक्या आहे. या दुकलीच्या स्वभावात असें अनौचित्य नाना तऱ्हांनी गुंफलेलें असल्यामुळे तिचें वागणें सारखें हास्याच्या उकळ्या फोडतें. ही दुक्कल तुम्हाला खचित आवडेल आणि नुसती आवडणारच नाही तर तुमची जिगर दोस्त बनेल.

प्रा. जोशानी केवळ चिमणराव व गुंड्याभाऊ यांच्या स्वभावांतील अनौचित्यच दाखविलें आहे, असें नाही. त्यांच्या चौफेर संचारणाऱ्या दोषशोधक दृष्टीने कितीतरी माणसांच्या स्वभावांतील व वर्तनांतील कितीतरी लहानमोठे दोष निवडून काढून हास्य पिकवलें आहे. या पुस्तकांत दोनतीनदा डोकावणारी चिमणरावाची आई पाहा. विमाएजंट मुलाकडे येऊन विम्याबद्दल बोलत असतां तिच्या अडाणी मनाला वाटतें, की आपल्या मुलाला 'विमा' नांवाची मुलगीच सांगून आली आहे ! सून कोंबडीचीं अंडीं सशक्तपणा-साठीं खाऊं लागली तेव्हा तिचें सोवळें बुडालें आणि रागावून घरांतून निघून जातांना ती रागाच्या सपाट्यांत उद्‌गारली, " दिवसेंदिवस तुम्ही

फारच वहावत चाललांत ! मी जात्यें निघून. आता खुशाल तुम्ही कोंबडी-चींच काय पण गोमातेचींसुद्धा अंडीं खा. " ! गुंड्याभाऊचे वडील श्री. धोंडोपत दांडेकर स्वतःला मोठे व्यवहारपटु समजतात; पण एका माणसाबद्दल वशिला लावण्यासाठी सोराबजी शेठकडे जातांना ते त्या माणसाचें नांवच टिपून घेण्याचें विसरतात ! शिवाय सोराबजीला ते वर म्हणतात, " –पण नांवाशीं तुला काय करायचं आहे ? तें अर्जांत लिहिलेलंच आहे." पण अर्जांत नांव असलें तरी धोंडोपंताच्या मनुष्याचा अर्ज कोणता हें सोराबजीला कसें कळणार, हें धोंडोपंतांना कळत नाहीं ! ' चहाडखोर पोपट ' या गोष्टींतील वक्रमाना रूपाने कशी असेल तें तिच्या नांवावरून तुम्ही ओळखालच. तिचें लग्न कां झालें नसेल हेंहि तुमच्यासारख्या चाणाक्ष मुलांना सांगावयास नको ही वक्रमाना आपल्या मालकिणीपाशी पुरुषांबद्दल बोलतांना म्हणते, " अष्टिभार्ये, स्वतः कसले वाटेल तसले थेर केले तरी चालतात त्यांना ! सगळ्या मेल्या पुरुषांना क्षिप्रा नदीच्या पुरांत ढकलून द्यावं ! हलक्या कानाचे नि त्याहून हलक्या मनाचे असतात मेले, म्हणून मी लग्न केलं नाहीं !" 'स्मरणशक्तीचे प्रोफेसर' तर स्मरणशक्तीवर व्याख्यान झोडतात पण स्वतःची मुलगीच आगगाडींत विसरतात ! माणसांच्या स्वभावांतील व वर्तनांतील दोष या प्रकारें दाखवून विनोद उत्पन्न करणें हें श्रेष्ठ विनोदाचें एक लक्षण समजतात. हे दोष पाहातांना आपण एकीकडे हसतो व दुसरीकडे दोषांची जाणीव होऊन सुधारूं लागतो. यावरून विनोद जसा समाजसुधारणेच्या कामीं उपयोगीं पडतो तसाच तो व्यक्तिसुधारणेच्या कामींहि कसा साह्यक ठरतो, तें तुमच्या लक्षांत येईल.

समाजांतील चालीरीति व माणसांचा स्वभाव यांत जसें अनौचित्य असतें तसें तें एखाद्या घटनेंत, प्रसंगांत किंवा कथानकांतहि असतें. लेखवजा विनोदी लेखन न करतां, लेखक जेव्हा गोष्टींच्या स्वरूपांत विनोदी लेखन करतो तेव्हा असलें अनौचित्य उघड करण्याचा त्याला साहजिकच अधिकच मोका मिळतो. कारण गोष्टीची घडण घटना, प्रसंग व कथानक यांतूनच व्हावयाची असते. प्रा. जोशांच्या या दहा विनोदी गोष्टींत असें अनौचित्यदर्शन वारंवार आढळेल आणि तें पाहून तुमच्यांत हशाचे वार

फुटतील किंवा स्मिताच्या चंद्रज्योति उमलतील. विमाएजंटांचा ससेमिरा चुकविण्यासाठीं चिमणराव अशी माहिती विमाकंपनीला पुरवितो कीं तिनें विमेदार म्हणून त्याच्याकडे जन्मांत ढुंकून पाहूं नये. पण विमाकंपनीला पुरविलेल्या माहितींत त्याच्या हातून अतिशयोक्ति व विसंगति फाजील होते आणि विमाकंपनीकडून त्याला पत्र येतें कीं ‘ आपल्या माहितीची एक प्रत आपल्या ऑफिसच्या मुख्य अधिकाऱ्याकडे व दुसरी येरवडा येथील इस्पितळाच्या अधिकाऱ्याकडे पाठविली आहे ! ’ येथे, विमाकंपनीला बनविण्याच्या नादांत चिमणरावावर नोकरी जाण्याचा व वेड्यांच्या इस्पितळांत पडण्याचा जो प्रसंग येऊं पाहातो त्यांत औचित्यविसंगति आहे व तेथेच विनोदाचें मूळ आहे. ‘ माझे दत्तक वडील ’ या गोष्टीमध्ये, आण्णा फाटकाकडून आपणांला भलें थोरलें घबाड मिळेल, असें चिमणरावाला वाटत असतें; पण उलट त्याच्याच घरीं चंगळ करून आण्णा फाटक पसार होतो व मागे विटांनी भरलेली ट्रंक फक्त ठेवतो. हा प्रसंगहि असाच विनोदी आहे. प्रसंगनिष्ठ विनोदाचें आणखी उदाहरण हवें असेल तर ‘ वेड्यांचें इस्पितळ ’ ही गोष्ट बघा. तींत चिमणरावाला नि गुंड्याभाऊला संभावित शहाणपणानें वेड्यांचें सर्व इस्पितळ दाखवणारा पेस्तनजी हाच खुद्द वेडा असल्याचें उघडकीस येतें ! ‘ गुंड्याभाऊचें दुखणें ’ या कथेंत गुंड्याभाऊचे दात दाखविण्यासाठीं गुंड्याभाऊबरोबर चिमणराव एका दन्तवैद्याकडे जातो. पण चिमणरावच आजारी असावा अशा समजुतीने, तो नको नको म्हणत असतां, दन्तवैद्य त्याचेच दात पाडतो !—ही घटनादेखील किती मजेदार आहे; नाही का ? ‘ चहाडखोर पोपट ’ व ‘ वशिला लावण्याची सक्त मनाई ’ या गोष्टींतहि अशा विनोदी घटना किंवा प्रसंग तुम्हांस बघावयास मिळतील. स्वभावांतील औचित्यविसंगतीवर आधारलेला विनोद साहित्यशास्त्रज्ञ सर्वश्रेष्ठ समजतात. त्याखालोखाल जर कोणाचा क्रम लागत असेल तर या प्रसंगनिष्ठ विनोदाचा होय.

अनौचित्याच्या दर्शनांतून विनोद उत्पन्न होतो, हें तुम्हांला समजलें. सामाजिक चालीरीति, व्यक्तींचे स्वभाव आणि प्रसंग यांत अनौचित्य कसें असतें व तें आपणांला कसें हसूं फोडतें, तेंहि तुमच्या ध्यानात आलें. पण तुम्ही

अशी समजूत करून घेता कामा नये, की अनौचित्य या तीनच गोष्टींत केवळ असतें. अनौचित्य ही चीज अशी आहे, का ती कोठहि असूं शकेल. कधी कधी शब्दांतच हें अनौचित्य असतें. उदाहारणार्थ, ' कंपॉझिटरचा सूड ' या कथेंत लिंबाजी ' लग्नसमारंभा 'ऐवजी ' नग्नसमारंभ ' अशीं अक्षरें छापतो किंवा ' श्रीयुत गंध्ये ' यांचें नांव ' श्रीयुत गध्ये ' असें जुळवतो. ' चहाडखोर पोपट ' या कथेंतील वर्णी प्रवासांत झालेल्या मारामारीचें वर्णन करतांना म्हणतो. " त्यांनी मला ठासा लगावला, मग मला त्यांनी लगावला. पुनः त्यांनी मला, मग मला त्यांनी— अशी मारामारी प्रेक्षणीय झाली " ! गुंड्याभाऊची थुकी तपासणाऱ्या डॉक्टराचे नांव आहे ' यमाजी भास्कर ', रक्त तपासणाऱ्या डॉक्टराचें नांव आहे ' रुधिरप्रिय ' आणि चिमणरावाचे दात पाडणाऱ्या डॉक्टराचें नाव आहे ' ब्रेकोडेन्टो ' ! ' स्पष्टवक्तेपणाच्या प्रयोगा'त विवाहिताच्या दुसऱ्या बायका यावर व्याख्यान देणाऱ्या आहेत ' कुमारी तरुणीबाई ', अध्यक्ष आहेत ' धनाजीपत वाचाळ ' व नकलाकार आहेत 'वांदरलाल पोपट'!—हीं सर्व शाब्दिक अनौचित्यांतून उत्पन्न होणाऱ्या विनोदाचीं किंवा शब्दनिष्ठ विनोदाचीं उदाहरणें होत. हा विनोद फारसा उच्च दर्जाचा समजला जात नाही व प्रा. जोशांच्या लिखाणात तो फारसा आढळत नाही. पण या सामान्य दर्जाच्या विनोदप्रकाराचा मोठा कौशल्यपूर्ण उपयोग कोल्हटकरांनी व गडकऱ्यांनी मात्र भरपूर प्रमाणात केला आहे.

कधी कधी अनौचित्यदर्शन विडंबनाने केलेलें असतें आणि त्यामुळे विनोद निर्माण होतो. विडंबन म्हणजे अनुकरण. लेखक कोणाची तरी किंवा कशाची तरी नक्कल करतो व ती करीत असतां मुळांतील दोष मोठे करून दाखवतो; किंवा नवें अनौचित्य तरी साधतो. या पुस्तकांत निरनिराळ्या पात्रांच्या तोंडीं लेखकाने घातलेली भाषा तुम्ही लक्षपूर्वक पाहा. तींत त्याने कोणाची तरी नक्कल करून त्याचे भाषादोष किंवा त्याच्या लकबी दाखवून दिल्या आहेत. उदहरणार्थ,—' कंपॉझिटरचा सूड ' या गोष्टींतील लिंबाजी व हेडगेसाहेब किंवा 'स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग' या गोष्टींतील नथूशेठ व गजाबाई यांची भाषा पाहाण्यासारखी आहे. विडंबनांत केव्हा केव्हा लेखक एकीकडची भाषाशैली उचलून ती भलतीकडेच वाप-

रतो आणि अनौचित्य साधतो. हा प्रकार तुम्हांला ' चहाडखोर पोपटा 'त चांगला बघावयास मिळेल. तेथे ' कादंबरी 'सारख्या संस्कृत ग्रंथांतील भाषाशैली एक साधी गोष्ट सांगण्यासाठी योजून विनोद साधला आहे.

अनौचित्यदर्शनाच्या अशा शेकडो तऱ्हा आहेत. कधी तें उपमादृष्टान्तांत असतें, कधी ते विचित्र कल्पनाविलासांत असतें, कधी तें अतिशयोक्तींत असतें, कधी तें गोष्टी ज्या क्रमाने घडतात त्या क्रमांत किंवा कथनाच्या क्रमांत असतें, तर कधी तें आणखी कशांत असतें. तीं सर्व ठिकाणें मी तुम्हांला सांगत बसत नाहीं. हें पुस्तक वाचतांना कुठें हसूं आलें, की तें अनौचित्यामुळ आलें का, असा पहिला प्रश्न तुम्ही स्वतःला विचारा. जर अनौचित्यामुळे हसूं आलें असेल तर तें विनोदाचें हास्य होय, असें समजून तुम्ही त्या अनौचित्याचें कारण काय, असा दुसरा प्रश्न स्वतःला विचारा. म्हणजे विनोदाचीं हीं सर्व उगमस्थानें तुमचीं तुम्हांला हळुहळू सापडतील.

या पुस्तकांत प्रत्येक कथेच्या शेवटीं टीपा व अभ्यास दिलेले आहेत. कथेंतील अवघड शब्दप्रयोगांचा अर्थ व माहीत नसलेले उल्लेख कळण्यासाठी तुम्हांला टीपांचा उपयोग होईल. अभ्यासांतील प्रश्न तुम्हांला वाचलेल्या कथेवर अधिक विचार करावयास लावतील. वर्गांत गुरुजी शिकवत असता जशीं कांही मुलें पेंगतात किंवा झिंगत बसतात तशीं काही मुलें वाचतांनाहि करतात. त्यांचे डोळे मजकुरावरून फिरतात, तोंडहि शब्दोच्चार करतें; पण काय वाचलें त्याचा अर्थ त्यांच्या मेंदूंत शिरत नाही. त्या मेंदूला ढोसून ढोसून जागें करावें लागतें. अभ्यासांतील प्रश्न अशी जागृति झोपाळूंना आणतील. जीं मुलें जागीं राहून वाचतात व विचार करतात त्यांची विचारशक्ति या प्रश्नांचीं उत्तरें देतां देतां हर्षभरित होऊन जास्त चलाख बनेल. तेव्हा, गोष्ट वाचीत असतां तुम्ही टीपांचा उपयोग करा आणि ती वाचून झाल्यावर कटाक्षाने अभ्यास सोडवा. वर विनोदासंबंधी जें विवेचन मीं केलें आहे तें तुम्हांला आताच पूर्ण समजलें नसलें तरी हरकत नाही. सर्व अभ्यास सोडवीत असतां किंवा सोडवून झाल्यावर तें पुनःपुन्हा पाहा, म्हणजे तें पूर्णपणें समजल्याशिवाय राहाणार नाही.

या पुस्तकात केवळ नमुन्यादाखल दहा गोष्टी निवडून तुम्हांला

दिल्या आहेत. त्या वाचून तुम्हांला विनोदी वाङ्मयाची गोडी उत्पन्न व्हावी, अशी अपेक्षा आहे. गोडी उत्पन्न झाली, की मग तुम्ही खूप खूप विनोदी वाङ्मय पोटभर वाचा. या पुस्तकांतील गोष्टी ज्यांनी लिहिल्या आहेत त्या प्रा. जोशांचीच किती तरी विनोदी पुस्तकें आहेत. 'ओसाड-वाडीचे देव' हें पुस्तक खास १० ते १५ वयाच्या मुलांसाठी त्यांनी लिहिलें आहे. तें तुम्हांला अगदी सोपें वाटेल, सहज समजेल आणि तुमचें मनोरंजन करील. शिवाय, 'चिमणरावाचें चऱ्हाट' 'आणखी चिमणराव' 'एरंडाचें गुऱ्हाळ' 'गुंड्याभाऊ' व 'वायफळाचा मळा' हीं त्याचीं पुस्तकेंहि तुम्ही जरूर वाचा. आजचे दुसरे विनोदी लेखक श्री. ताम्हनकर यांचा 'गोट्या' तुमच्यातलाच एक पुंड, हुशार आणि गमत्या मुलगा आहे. तो तुम्हांला आवडेल, यांत शंकाच नाही. ताम्हनकरांचा 'दाजी' वयाने गोट्यापेक्षा मोठा आहे. तुमची त्याची गट्टी जमणें कठिण; पण जमली तर ती अवश्य करा. गोट्या व दाजी या पुस्तकांचे अनेक भाग आहेत, हें मात्र लक्षात ठेवा. मराठींतील विनोदी वाङ्मयाचें आद्य आचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचें विनोदी वाङ्मय 'सुदाम्याचे पोहे' या नांवाने प्रसिद्ध झालेलें आहे आणि गडकऱ्यांचें विनोदी वाङ्मय 'संपूर्ण बाळकराम' या पुस्तकांत एकत्र झालेलें आहे. तें किंचित् अवघड आहे; पण थोड्या प्रयत्नाने समजून घेतलें तर त्यांत विनोदरस असा रसरसला आहे, की काही पुसूं नका! निदान 'सकाळचा अभ्यास' हा 'संपूर्ण बाळकरामा' मधील संवाद तरी तुम्ही वाचाच वाचा. सकाळीं अभ्यास करणाऱ्या तुमचें किंवा तुमच्या धाकट्या भावंडांचें चित्र तुम्ही जणू आरशांत बघत आहात, असें तुम्हांला वाटेल व अमाप मौज लुटायला सापडेल.

असो. माझी ही प्रस्तावना तुम्हांला थोडीशी लांबल्यासारखी वाटली असेल.—होय ना? तुम्ही आहांत गोष्टीवेल्हाळ. तुम्हांला गोष्टी वाचण्याची असणार घाई. त्यांतून, मी या गोष्टींची या प्रस्तावनेंत जी ओळख करून दिली तीमुळे तर त्या वाचण्याला तुम्ही विशेष उत्सुक असणार. तेव्हा, मला आता थांबलेंच पाहिजे. अच्छा!

२५३/७ सदाशिव, पुणें २.
२६ जानेवारी १९५५

द. न. गोखले.

# अनुक्रमणिका



कोठून कोणत्या कथा घेतल्या !

* एरंडाचें गुऱ्हाळ : कथा १ ली व ९ वी * चिमणरावाचें चऱ्हाट : कथा २ री व ३ री * आणखी चिमणराव : कथा ५ वी, ६ वी, ७ वी. * वायफळाचा मळा : कथा ८ वी व १० वी * गुंड्याभाऊ : कथा ४ थी.

# स्मरणशक्तीचे प्रोफेसर : १ :

माझ्या[१] विद्यार्थिदशेंतील गोष्ट. मी पुण्याहून मध्यरात्रींच्या मेलने निघून दौंडास गाडी बदलून अहमदनगरास जात होतों. सकाळीं नगरच्या जवळ गाडी आली होती. माझ्याशीं माझे उतारूबंधु प्रो. विसरभोळे, मुंबईच्या कोकण कॉलेजांतील तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्र या विषयांचे अध्यापक, गप्पा मारीत होते.

"वेल्, यंग मॅन्[२]" प्रोफेसर म्हणाले, "अलीकडच्या विद्यार्थ्यांची स्मरणशक्ति अतिशय बिघडली आहे. आमच्या वेळची सबंध काव्येंची काव्यें मुखोद्गत म्हणविणारी राक्षसी स्मरणशक्ति कोणीकडे; आणखी आता दहापांच संस्कृत क्रियापदांचें डिक्लेन्शन[३] जड वाटणाऱ्या पोरांचीं गळकीं डोकीं कोणीकडे! मी लहान होतों तेव्हा शाळेत शंभर शंभर ओळी कविता रोज पाठ कराव्या लागत; शिवाय धातुरूपावली, नामरूपावली, गणितांतले फॉर्म्युले[४] काय न् केमिस्ट्रीचे फॉर्म्युले, इतिहासांतल्या सनावळ्या न् वंशवृक्ष—"

"अरे बापरे! कोण अवघड हा पूर्वीचा अभ्यासक्रम आणि हल्ली मात्र अभ्यासाचा बोजा वाढत चालला आहे म्हणून लोकांनी नुसतीच ओरड चालवली आहे. बरें, पण प्रोफेसरसाहेब! आत्तांच या शक्तीचा

"त्याचें विस्तृत विवेचन मीं आपल्या 'मानसशास्त्र आणि त्याचे व्यावहारिक उपयोग' या ग्रंथात केलें आहे. एखाद्या इंद्रियाचा किंवा शक्तीचा दीर्घकाल उपयोग न केल्यास तें इंद्रिय किंवा शक्ति नष्ट होते असा सामान्य नियम आहे. तुम्हांला कान हलवतां येतो का ?"

"नाही बुवा !"

"तोच गाढवाला कां बरें हलवतां येतो ? पूर्वी कानास चलनशक्ति होती, पण मनुष्यप्राण्याने पिढ्यान् पिढ्या या शक्तीचा उपयोग न केल्याने ती नाहीशी झाली. तीच गाढवाने कायम ठेविली आहे. मग सांगा पाहूं, मनुष्यापेक्षा गाढव श्रेष्ठ आहे कीं नाही ?"

"तुमच्यावरून तसें वाटतें खरें." मी बोलून गेलों; पण सुदैवाने प्रोफेसरांचें तिकड लक्ष नव्हतें.

"स्मरणशक्तीला नेहमी व्यायाम दिला पाहिजे. त्याचप्रमाणे सादृश्य[५] पाहून गोष्टी ध्यानांत धरण्याची खुबी माहिती असली पाहिजे. घोकंपट्टीला आधुनिक लोक नांवें ठेवितात, पण घोकण्याने स्मरणशक्ति कशी दृढावते हें त्यांच्या ध्यानांत येत नाही. लहानपणीं भूगोल पाठ करतांना असे किती मजेदार आडाखे मीं बांधून ठेविले होते ! माडागास्कर[६] बेटाचें नांव लक्षांत राहावें म्हणून वर्गातल्या माडगावकर नांवाच्या मुलाशीं त्याची खूणगाठ बांधून ठेवली होती. आता या धोंड–मनमाड लायनीने आपण जात आहों ना ? या लाइनचें नांव कसें लक्षांत ठेवाल ?" प्रोफेसरांनी मला आव्हानपूर्वक विचारिलें.

"त्यांत काय आहे ? हें नाव लहानपणापासून मला माहीत आहे न् मरेपर्यंत मी विसरणार नाही. आपोआपच तें माझ्या स्मरणांत राहील." मी म्हणालों.

"नॉन्सेन्स[७] ! शास्त्रीय पद्धत ही नाही. असोसिएशन ऑफ आय्डियाज् –ज्याला मीं आपल्या ग्रंथांत 'कल्पनांचें साहचर्य'[८] असें नांव दिलें आहे, त्या तत्त्वाप्रमाणे सर्व गोष्टी स्मृतींत ठेवाव्या. आता ऐका. धोंड म्हणजे धोंडा – दगड. आणखी मनमाड म्हणजे मॅन्–मॅड्. मॅन्–मॅड् याचें उलटें करा म्हणजे काय झालें ?" त्यांनी विचारिलें.

“ मॅड्–मॅन् म्हणजे वेडा मनुष्य ” मीं उत्तर दिलें.

“ आता आली शृंखला ध्यानांत ! धोंडा आणखी वेडा मनुष्य यांत अंतर काय आहे ? ”

“ यांत अंतर कांहीच नाही. ” मी म्हणालों.

“ अगदी चूक ! अहो, १४६ मैलांचें अंतर आहे. पाहा टाइमटेबल काढून. १४६ या आकड्याची मूर्ति ( इमेज ) डोळयापुढे धरली की, तो आकडा कधीहि विसरावयाचा नाही. एकमुख विष्णु आणि षण्मुख



“ या तीन देवांच्या डोक्यांच्या संख्या अनुक्रमाने मोजा की, १४६ आकडा ध्यानांत येईल ”

कार्तिकेय यांच्यामध्ये चतुर्मुख ब्रह्मदेवाची स्वारी विराजमान झालेली आहे, असा देखावा तुम्ही आपल्या कल्पनेपुढे आणा. या तीन देवाच्या डोक्यांच्या संख्या अनुक्रमाने मोजा की, १४६ आकडा ध्यानात येईल. हाः हाः हाः! आता मला ज्या ठिकाणीं जावयाचें आहे, त्याचे नाव अहमदनगर. हें नांव ध्यानांत ठेवणें मोठें कठिण आहे. ''

" कां बरें ? माझ्या तर ध्यानांतून हें नांव कधीच जात नाही. '' मीं चकित होऊन म्हटलें.

"अहो, अहमदनगर आणखी अहमदाबाद या दोहोंत सामान्य असलेला अहमद नेहमी घोटाळा घालतो. त्यामुळे अहमद पदाची मूर्ति ठळकपणें स्मरणांत ठेवण्याची सोय नाही. बरें, नगर या पदावर जोर द्यावा तर वडनगर, टाटानगर, आनगर अशीं अनेक नगरें आहेत. म्हणून अहमद-नगराचें नांव डोक्यांत राहाण्यासाठी मीं एक कारिका[१०] जुळविली आहे.'' प्रोफेसरांनी सांगितलें.

" कोणती बरें कारिका ती ? ''

प्रोफेसर खाकरले, जरा ताठ बसले आणि त्यांच्या तोंडून खालील चरण बाहेर पडला—

'दिवस गर्व नसे विष ज्या पुरी !'

" पण या ओळीने अहमदनगर हें नांव कसें लक्षांत ठेवायचें हें नाही मला समजत. '' मीं आक्षेप घेतला.

" तें अगदी सोपें आहे. दिवस म्हणजे अह, जसें ' अहश्च, रात्रिश्च उभे च सन्ध्ये. '[११] गर्व म्हणजे मद, नसे म्हणजे न, आणखी विष म्हणजे गर ! अह-मद-न-गर ? झालें कीं नाही ? हिः हिः हिः ! '' प्रोफेसर विजयमदाने हास्य करूं लागले.

आता या स्मरणशक्तीच्या रामबाण युक्त्या ऐकून फायदा होण्या-ऐवजी वेड लागण्यास मात्र मदत होईल असें वाटून मीं विषय बदलला व ' आपण नगरास कोणत्या कामाकरिता जात आहां ? ' असें प्रोफेसरांस विचारलें.

" माझी मुलगी—काय बरें तिचें नांव ? अर्जुनाने जिचें सांबेरं केलें ती कोण—प्रमिला, नाही—चित्रांगदा——"

" सुभद्रा—" मीं सुचविलें.

" हो, हो ! थँक यू ! सुभद्रा. तिला नगरास दाखविण्यासाठी नेतों आहें. तिथे एक चांगलें स्थळ आहे. आठवले त्याचें नांव—"

" काय बरें ? "

" सांगितलें नाही का आता ? विसरलों पाहा इतक्यांत—"

" पण आताच म्हणालां ना ! ' आठवले त्याचें नांव ' असें ? "

" यस्, थँक यू ! आठवले हेंच त्यांचें नांव."

इतक्यांत नगरचें स्टेशन येऊन गाडी थांबली. प्रोफेसरांचे बंधु कीं कोणसें स्टेशनवर आले होते, ते जवळ आले. " कसें काय दादा ? आलांत पत्रांत कळविल्यासारखे ! हें काय ( डब्यांत नजर फेकून ) सुभीला नाही आणलीत ! एकटेच येऊन काय करणार इथे ? "

प्रोफेसर भांबावल्यासारखे झाले व उद्गारले, " अरे ! सुभीला पुण्यास तर घेतल होत बरोबर ! ( आठवून ) पण काय मी गाढव आहें! धोंडया-च्या स्टेशनवर उतरतांना मीं तिला तशीच निजलेली सोडून दिली वाटतं. आता सोलापूरच्या स्टेशनमास्तरला तार दिली पाहिजे मद्रास मेलमधून तिला उतरवून घ्यायला ! "

✦ ✦

## टीपा—

(१) ही गोष्ट चिमणराव सांगत आहे. (२) वेल् – ठीक. यंग मॅन् – तरुण माणसा. (३) क्रियापदाचे डिक्लेन्शन् – क्रियापदें चालविणे, क्रियापदांचीं रूपे म्हणणें. (४) फॉम्युले – सूत्रे (५) सादृश्य – सारखेपणा. (६) माडागास्कर – हें आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यास असलेलें एक बेट आहे. (७) नॉन्सेन्स – मूर्खपणा. (८) साहचर्य—जवळीक. (९) शृंखला – साखळी.

कल्पनेला कल्पना कशी जोडली आहे, याचा उमज. (१०) कारिका – अर्थबोधक श्लोक. (११) अहश्च रात्रिश्च उभे च सन्ध्ये–दिवस, रात्र आणि दोन्ही सन्ध्यासमय हें संस्कृत अवतरण प्रोफेसरांनी उगाचच दिलें आहे! (१२) प्रो. विसरभोळ्यांना येथे 'हरण' म्हणावयाचे आहे. पण ते विसरून 'साबर' म्हणतात.

## अभ्यास–

(१) माडागास्कर, धोंडमनमाड, अहमदनगर व मुंब्रा ही नावें लक्षांत ठेवण्यासाठी प्रो. विसरभोळ्यानी कोणत्या युक्त्या योजिल्या होत्या ? त्यांच्या या युक्त्यांच्या उपयुक्ततेबद्दल चिमणरावाना काय वाटले असावे ? तुम्हांला काय वाटतें ?

(२) प्राध्यापकवर्गातील अनेक बारके बारके दोष उजेडात आणण्याचा प्रयत्न या कथेत जातां जातां केला आहे. विसरभोळेपणा, जुन्या पिढीच्या व्यासंगीपणाचे गोडवे गाण्याची हौस, आपल्या ग्रंथाचा वारवार उल्लेख करणें, सोप्या गोष्टी अवघड करून विद्वत्ता दाखवू पाहाणे, इंग्रजी शब्द व अवतरणें बोलण्यांत आणणे वगैरे दोष कोठे कोठे उजेडांत आणले आहेत ? हुडका पाहूं.

(३) प्रो. विसरभोळ्यांच्या वागणुकींत कितीतरी विसंगति आहेत, त्या कोणत्या ?

(४) या कथेत शेवटी कथानकाला अनपेक्षित वळण मिळतें कां ? कोणतें ?

(५) विसरभोळेपणामुळे उत्पन्न झालेल्या पांच गमती लिहून काढा.

✦ ✦ ✦

# विमाएजंटास चकविणें : २ :

जर्मन महायुद्धाच्या वेळीं [1] पुणें येथें सरकारनें हिशेब ठेवण्यासाठी मोठीं थोरलीं हंगामी ऑफिसें उघडलीं. लढाईच्या महर्गतेनें पांढरपेशा लोकांची जी दाणादाण उडाली, तींत पुण्याच्या वॉर ऑफिसांनी त्यांस चांगला हात दिला हें प्रसिद्ध आहे. मॅट्रिक झालेल्या इसमानें समक्ष अर्ज करण्याचा अवकाश, की त्यास साठाची व बी.ए.स एकशेविसाची नोकरी हटकून ठेवलेलीच. वशिल्याच्या तट्टांस तर त्याच्या दुप्पट तनखा मिळत असे; परंतु असल्या प्राण्यांत गणना होण्याइतका भाग्यवान् नसल्यानें मला साठ रुपयांचाच प्रारंभ मिळाला.

निवळ मॅट्रिकवर इतके रुपये मिळत असल्यानें छप्पन देशाचे कारकून पुण्यास लोटलेले होते. मद्रासचे एन् माडती आप्पा, पंजाबचे धिप्पाड दाढीवाले लाला, बंगालचे भुकेकंगाल बाबू इत्यादि लोक आपआपल्या देशांतून येतांना निसर्गदत्त लोण्यांशिवाय फारशीं अधिक वस्त्रें न घेतां येत. कारण कापडाची महागाई इतकी भयंकर झाली होती की, त्या वेळीं धोतरजोडीस जी किंमत पडत असे तिच्यांत हल्ली इरकली लुगडें मिळूं शकतें.[2] परंतु हे बुभुक्षु[3] लोक एक महिन्याचा पगार हातीं पडतांच नखशिखान्त साहेबी पोशाखांत विराजमान होऊन व्हॅसेलिन, पोमेड, ब्रिलियनूटाइन वगैरे उपयुक्त जिनसांच्या किंमती आणखी वर चढवीत

असत. मीहि एकदोन महिन्यांत अप-टु-डेट बनलों हें सांगावयास नकोच. एक लहानसें बिऱ्हाड भाड्याने घेऊन त्यांतील पुढल्या खोलींत टेबलखुर्च्यांचा थाट ठेविला आणि दारावर—–

| चिमणराव विठ्ठल जोग<br>मॅट्रिक ( बॉबे )<br>मिलिटरी अकाउंट ऑफिस |
|---|

अशी इंग्रजी अक्षरात पाटी लाविली. परंतु या माझ्या थाटाने दोन ब्यादी माझ्यामागे लागल्या. एक उपवर मुलींचे बाप व दुसरी विमा कंपन्यांचे एजंट म्हणजे दलाल. या वर्षी मुलींच्या बापांस चकविण्यासाठी ज्या यातायाती मला कराव्या लागल्या त्यांचा अनुभव आमच्या पुरुषवाचकांपैकी जे विवाहित आहेत त्यांस पूर्वीच आला असेल; व जे अविवाहित आहेत त्यांस येणार आहेच म्हणून त्यांचें वर्णन करण्याच्या भरीस मी पडत नाहीं.

एका रविवारीं दुपारीं चार वाजतां आई चहा करीत होती व मी त्याची वाट पाहात हातात एक कादंबरी घेऊन खुर्चीवर बसलों होतों. इतक्यांत दाराशीं एक किंचित् उतार वयाचा गृहस्थ डोक्यास पुणेरी पगडी, खांद्यावर उपरणें, अंगांत जुना झालेला काळया सर्जचा कोट, आणि हातांत कातड्याची हातबॅग अशा थाटाने आला व त्याने मला लवून नमस्कार केला. त्याच्याकडे पाहून मला वाटलें, की हा एखाद्या मुलीचा बाप असेल; म्हणून मी अंमळ अभिमानपूर्वक श्रीमंताप्रमाणे त्यास प्रति-नमस्कार करून समोरच्या खुर्चीवर बसण्याची खूण केली, व " काय ? " असें मानेनेच विचारलें.

खुर्चीवर बसत बसत त्याने विचारलें, " आपण विठ्ठलराव जोगांचे चिरंजीव, नाही का ? "

" होय. आपली अन् त्यांची ओळख होती वाटतं ? —आई, आणखी एक कप आधण टाक ग !"

" हो चांगली ओळख होती. फारच सज्जन माणूस ! त्यांची तब्येत कशी काय आहे ? "

" त्यांना वारल्याला आज दोन वर्षे झाली. "

" अरेरे ! फारच वाईट झालं. असो. लाख माणूस होता ! आपल्यांला काय सिक्युरिटी पे आहे, नाही का? आम्हाला आपल्याबद्दल आपल्या ऑफिसांतले खंडेराव दाभाडे सांगत होते. त्यांची न् तुमची ओळख असेलच."

यानंतर आमचे खंडेराव दाभाड्यांबद्दल बरेंच बोलणें झालें. मध्येच आईने " चिमाप्पा, चहा घेऊन जा बाळ ! " अशी हाक मारली, तेव्हा आंत गेलों. चहाचे दोन पेले हातांत देतां देतां तिने, "कोणरे आहेत ते ?" असा प्रश्न मुद्रेनेच केला.

" असेल मुलगी सांगायला आलेला ! " असें अभिमानाने व तुच्छतेने बोलून मी पेले घेऊन बाहेर आलों व त्या गृहस्थापुढे एक पेला ठेवला. मुलींचे बाप अशा वेळीं आपल्यापुढे ठेविलेले चहाचे कप म्हणजे आपल्या योग्यतेक्षा आपणांस अधिक दिलेल्या मानाचे पेले आहेत असें समजून अत्यंत लीनतेने, आपण या मानाला योग्य नाही असें सुचविण्याचें धाडस करितात; परंतु या उर्मट गृहस्थाने तो चहा आधाशाप्रमाणे एकदाच पेला तोंडास लावून फस्त केला. त्याची धिटाई पाहून मला या अपमानाचा इतका राग आला, की याने कितीहि हुंडा दिला तरी याची मुलगी साफ पतकरावयाची नाही असा मीं निश्चय केला; आणि त्यास म्हटलें, " बरं आहे. मिस्टर, मला आता एंगेजमेंट[४] आहे. तुमचं काय काम आहे तें एकदा सांगून मला मोकळा करा. "

" हो, तें आता सांगणारच होतों. ( आपल्या बरोबरचें दप्तर सोडीत— त्यांत बहुधा मुलीची पत्रिका व फोटो असतील असें वाटलें. ) आपले मित्र खंडेराव सांगत होते की, आपल्यांला यंदा करायचं आहे म्हणून ! " या उर्मटाला गारद करण्याची हीच संधि आहे असें जाणून जरा ताठ होऊन मीं वरपक्षीयांचें ब्रह्मास्त्र सोडिलें, " छे बोवा, यंदा कर्तव्य नाही. "

" छे, छे ! तरुण मनुष्यांचं चुकतं तें इथंच, यंग रास्कल्नं[५] एका ठिकाणीं म्हटलं आहे, ' इट् इज् नेव्हर टू अर्ली टु —"

" मॅरी !"[६] मीं त्याचें वाक्य पूर्ण केलें.

" होय ! ॲण्ड टु इन्शुअर. रामदासांनीदेखील म्हटलं आहे, ' घटका

जाती, पळें जाती, तास वाजे झणाणा । आयुष्याचा काळ जातो, विमा कां रे उतराना ॥' " असें[८] अवतरण देऊन अपल्या विनोदाने तो आपणच हसूं लागला. मला वाटलें, ' लग्न का रे करा ना ' तो म्हणेल ! पण विम्याची गोष्ट त्याने काढिली तेव्हा हा मुलीचा बाप नसून विमाएजट आहे असें मला वाटूं लागलें.

आमच्या मातोश्री दाराच्या फटींतून पाहातच होत्या; त्या आपलें अस्तित्व जाणवण्याच्या उद्देशाने म्हणाल्या, " काय हो, तुम्ही मुलगी सांगायला आला असला तर सांगते, पहिल्यांदा पत्रिका जुळल्याशिवाय लग्नाचं जमायच नाही हो !"

" हो, हां ! अन् मी तरी पत्रिका न् कुंडल्या दाखविल्याशिवाय कुठं यांना ' लग्न ' करायला सांगतों आहें ? अहो, विमा म्हणजे तरी एक तऱ्हेचं लग्नच ! "

" विमाचं लग्न ! अलीकडे मेलीं पोरींचीं चांगलीं चागलीं नांवं ठेवून पुनः आमच्यासारखं कमा, विमा अशी जुन्या तऱ्हेनं हाक मारण्याची पद्धत पडली आहे ! विमल का तुमच्या मुलीचं नांव ? " आईसाहेबांनी विचारलें. पण आता तिने येथे जास्त वेळ उभें राहून आपली व माझी शोभा करूं नये म्हणून कांही तरी निमित्त काढून मीं तिला घरांत जावयास लाविलें.

" या पहा आमच्या कुंडल्या !" एजंट आपल्या बॅगमधून कंपनीचे प्रॉस्पेक्टस् काढून त्यांतलीं कोष्टकें दाखवीत हसत म्हणाला. त्याने आपल्या कंपनीबद्दल सर्व तऱ्हेची माहिती दिली व हो ना करता करतां एक हजाराचा विमा उतरण्याचें वचन मजकडून घेतलें.

" आता तुम्ही हा प्रपोजल फॉर्म[१०] भरून ठेवा; आणखी हे कांही प्रश्न कंपनीनं विचारले आहेत त्यांचीं उत्तरं उलट बाजूच्या कॉलममध्ये[११] लिहा. मी आता सोलापुरास जाणार आहें, आल्याबरोबर हे दोन्ही फॉर्म आपण कंपनीकडे पाठवूं या. "

" कशाला ? मीच हे पोस्टानं पाठवून देईन म्हणजे झालं. " मीं म्हटलें. मग पुनः कंपनीचें उत्तर येतांच भेटण्याचें कबूल करून तो गृहस्थ

पुनः मला न विसरतां फॉर्म पाठविण्याविषयी बजावून निघून गेला. हा मुलीचा बाप आहे असें समजून मी जो हरभऱ्याच्या झाडावर चढलों होतों, त्यावरून त्यानें मला खाली ओढून आणल्याबद्दल मी संतापून गेलों होतों! त्यांतून ही विम्याची मजा नको असलेली ब्याद! मला असे किती तरी इसम माहीत आहेत, की विमा उतरून त्याचे हप्ते भरतां भरतां



“ अहो, विमा म्हणजे तरी एक तऱ्हेचं लग्नच ! ”

बेजार झालेले आहेत, पण मरत नाहीत.[12] मीं प्रपोजल फॉर्म भरला आणि त्यासोबत कंपनीने पाठविलेली प्रश्नपत्रिका उत्तरांनी भरली व कंपनीकडे पाठवून दिली. ज्याना एन्शुरन्स एजंटची पीडा टाळावयाची असेल त्यांना माझीं उत्तरें उपयोगी पडतील असे वाटल्यावरून खालीं देत आहे :—[13]

**प्रश्न**—तुमचा धंदा कोणता आहे ? या धंद्यांत तुम्ही किती वर्षे चालू आहां, तुंमचा पूर्वीचा धंदा कोणता होता ? चालू धंद्यांत बदल करण्याचा तुमचा विचार आहे काय ?

**उत्तर**—मिलिटरी अकाउंट ऑफिसांत कारकून आहें. एक वर्षापूर्वीचा धंदा विद्यार्थ्याचा होता. चालू धंद्यांत फरक करण्याचा माझा विचार आहे. मात्र कोणी तरी मला घरजावई करून घेण्यास तयार झाला पाहिजे.

**प्रश्न**— तुमचें वय काय आहे ? जन्म कोठे झाला ?

**उत्तर**—वय २२ वर्षे ८ महिने १७ दिवस ५ तास ४० मिनिटें. जन्म बाळंतिणीच्या खोलींत बाजेवर झाला.

**प्रश्न**—तुमचें वजन, उंची, छातीचा घेर ( फुगवून, न फुगवितां ) व पोटाचा घेर द्या.

**उत्तर**— वजन ७१ पौंड; उंची ५ फूट ९।। इंच; छातीचा घेर छाती फुगवून २४ इंच व न फुगवितां २३।।। इंच; पोटाचा घेर ४८।।इंच.

**प्रश्न**— तुम्ही ( १ ) अल्कोहोलयुक्त[४] पेयें, ( २ ) तंबाकू, ( ३ ) अफू, व ( ४ ) इतर मादक द्रव्यांचें सेवन करतां काय ? करीत असल्यास कोणत्या प्रमाणांत करितां ?

**उत्तर**— या द्रव्यांचें सेवन मी फारच माफक प्रमाणांत व नियमित करितों. कधींहि चुकवीत नाहीं. दररोज एक पॉइन्ट व्हिस्की, पावशेर तंबाकूचा धूर, दोन तोळे अफू, आणि गांजा, भांग इत्यादि मादक द्रव्यांचें सेवन प्रसंगानुसार करीत असतों.

**प्रश्न**— पुढील कौटुंबिक कोष्टक शक्य तितक्या बिनचूक रीतीने भरून द्या.

| नांव | जीवत असल्यास वय | मृत असल्यास मरतांना वय | मरणाचें कारण |
|---|---|---|---|
| बाप | असते तर ५९–६–४ | ५५–४–५ | मरणं प्रकृतिः शरीरिणाम्। कारण दुसरें काय ? |
| आई | ५१ सुमारें | अजून कळलें नाही | मेल्यावर सांगेन. |

| नांव | जीवंत असल्यास वय | मृत असल्यास मरतांना वय | मरणाचें कारण |
|---|---|---|---|
| बापाचा बाप | असता तर सुमारें ८० | २१ वर्षे | आनुवंशिक राजयक्ष्मा[१६] |
| बापाची आई | असती तर सुमारें ७४ | १६ वर्षें | माझ्या बापाच्या वडील भावाचें जन्मकाळीं बाळंतरोगाने मेली. |
| आईचा बाप | असता तर सुमारें ४९ | ४०–६–६ | हार्ट डिसीज, अतिसार व महामृत्युंजय या रोगांच्या कॉम्प्लिकेशननें |
| आईची आई | असती तर ४६ | ३५ वर्षें | रक्तक्षय आणि अतिरक्त या रोगांच्या मिश्रणाने |
| भाऊ | नाहीत | ... | न जन्मल्यामुळे मेले नाहीत. |
| बहीण | १३ वर्षें | ... | ... |

**प्रश्न**— तुम्हांला कधी अपघात झाला होता काय? तुमच्यावर शस्त्रक्रिया करावी लागली होती काय? ( असल्यास सविस्तर वर्णन करा. )

**उत्तर**— एकदा लहानसा आपघात झाला होता. आखाड्यांत दांडपट्टा खेळत असतां प्रतिस्पर्ध्याचा वार लागून माझें शिर उडालें होतें. या क्षुल्लक अपघाताशिवाय गंभीर स्वरूपाचा आघात मजवर कधी झाला नाही. हा अपघात शस्त्राने झाला असल्याने यालाच शस्त्रक्रिया म्हटलें तरी चालेल. बाकी नापिताकडून[२१] होणाऱ्या साप्ताहिक शस्त्रक्रियेशिवाय महत्त्वाची शस्त्रक्रिया मजवर झाली नाही.

**प्रश्न**— आजारीपणाबद्दल वैद्यकीय दाखला मिळवून तुम्हांला कामावरून गैरहजर राहावें लागलें होतें काय?

**उत्तर**— आमच्या कचेरींत रजा मिळविण्यास नेहमीच वैद्यकीय दाखला आणावा लागतो.

प्रश्न— तुम्हांला एखादा चिंताजनक रोग झाला होता काय ? त्याचप्रमाणे पुढील रोगांपैकीं एखाद्या रोगाने आपण आजारी होतां काय ? (अ) अपेंडिसायटिस[२२], रक्तक्षय, वगैरे ताप; (ब) वेड, [२३]अपस्माराचे झटके, संधिवात. (क) इतर प्रत्येक रोगांत किती दिवस अथरुणावर पडून होतां ?

उत्तर—आपण विचारलेले सगळे रोग वेळोवेळीं मला झालेले होते. (अ) अपेंडिसायटिसने १० वर्षे ४ महिने, रक्तक्षयाने ५ वर्षे ३ महिने, आणि वगैरे तापाने ३ वर्षे ६ महिने; याप्रमाणे १९ वर्षे १ महिना अंथरुणांत पडून होतों. (ब) वेड आणि अपस्माराचे झटके यांत ४ वर्षे अंथरूण सोडून देऊन कविता रचीत भटकत होतों. (क) इतर म्हणजे निद्रा या रोगाने ११ वर्षे ४ महिने ८ दिवस ८ तास पडून राहिलों होतों.

याप्रमाणे कंपनीच्या प्रश्नांचीं उत्तरें लिहून पाठविलीं; व कंपनी मला विमा उतरण्यास नालायक ठरवील व आयतीच एजंटाची ब्याद टळेल अशा अपेक्षेने मी आपल्या युक्तीबद्दल स्वतःस शाबासकी देत बसलों. परंतु दोनतीन दिवसांत कंपनीकडून खालीलप्रमाणे मला पत्र आलें !

अमुक तमुक लाइफ इन्शुरन्स कंपनी, मुंबई.
ता. अमुक, माहे तमुक, सन १९१७.

लाडके साहेब,

आपलें आमच्या कंपनींत विमा उतरण्याचें प्रपोजल व माहितीचें पत्रक हीं पावलीं. आपल्या थट्टेखोर स्वभावाचें कौतुक वाटून आपल्या उत्तराची एक प्रत आपल्या ऑफिसच्या मुख्य अधिकाऱ्याकडे व दुसरी येरवडा येथील वेड्यांच्या इस्पितळाच्या अधिकाऱ्याकडे पाठविली आहे. येरवड्याच्या इस्पितळाची हवा खाऊन आपल्या स्वभावांत गांभीर्य आल्यावर आमचा एजंट आपली भेट पुनः घेईल. कळावें.

आपला
बिलकूल गिचमीड सहीवाला
मॅनेजिंग डायरेक्टर.

पत्र वाचतांच एजंटास चकविल्याबद्दलचा माझा आनंद पार मावळून गेला; माझी नोकरी संभाळण्याकरिता व वेड्यांचें इस्पितळ चुकविण्याकरिता मला कोण यातायात पडली ती माझी मलाच माहीत !

## टीपा

(१) हें १९१४ सालीं सुरू झालेलें पहिलें महायुद्ध होय. त्यांत आपल्यावर तेव्हा राज्य करणारे इंग्रज लोक जर्मनांविरुद्ध लढत होते. (२) ही स्थिति गोष्ट लिहिली तेव्हाची, म्हणजे पहिल्या व दुसऱ्या महायुद्धाच्या मधल्या काळांतली आहे. (३) बुभुक्षु–भुकेलेले. (४) एंगेजमेंट–आगाऊ ठरलेला कार्यक्रम. (५) यंग रास्कल ही व्यक्ति काल्पनिक आहे. यंग रास्कल–तरुण हरामखोर. (६) इट् इज् नेव्हर टू अर्ली टु मॅरी–लग्नाला लहान वय कधीच नसतें. (७) टु इन्शुअर–विमा उतरणें. (८) हें अवतरण एजंटाने रामदासांच्या नांवावर दडपून दिलें आहे.(९)प्रॉस्पेक्टस्–संस्थेच्या महत्त्वाच्या अंगांची माहिती देणारें पत्रक. (१०) प्रपोजल फॉर्म–विमा उतरविण्याची इच्छा दर्शविणारें पत्रक. (११)कॉलम–रकाना, स्तंभ. (१२) विमेदाराच्या हातून विम्याचे हप्ते चुकले तर भरलेल्या हप्त्यांचे पैसेहि बुडण्याचा संभव असतो. म्हणूनच अनिमित व थोडी प्राप्ति असणारे लोक विमा उतरतांना बिचकतात. (१३) सर्व हप्ते भरीपर्यंत विमेदार जगला तर विमाकंपनीच्या तें फायद्याचें असतें. म्हणून प्रश्नपत्रिकेंतील उत्तरांवरून विमेदार दीर्घायुषी होईल, याबद्दल कंपनी सर्व प्रकारें खात्री करून घेते. त्या दृष्टीने पुढील प्रश्न विचारलेले आहेत. (१४)अल्कोहोल–एक मादक द्रव्य. (१५) मरणं प्रकृतिः शरीरिणाम्–मरण हा प्राण्यांचा स्वभावधर्म आहे. (१६) आनुवंशिक–वंशपरंपरेने आलेला. राजयक्ष्मा–क्षयाचा एक प्रकार. (१७)हार्ट डिसीज–हृदयविकार. (१८)अतिसार–जींत मलविसर्जन फार होते अशी हगवण. (१९) महामृत्युंजय–हें एक औषध आहे, रोग नाही.

(२०) कॉम्प्लिकेशन – गतागत. (२१) नापित – न्हावी. (२२) अपेंडिसायटिस – आतड्याची सूज. (२३) अपस्मार – फेपरें.

## अभ्यास

(१) चिमणरावाने दारावर लावलेली पाटी व एजंटाशी केलेलें प्रारंभीचे वर्तन यांवरून त्याच्या स्वभावाबद्दल तुम्हाला कोणत्या गोष्टी समजतात ?

(२) विमाएजंट व चिमणरावाची आई यांचे सगळे वर्तन बारकाईने पाहून प्रत्येकाच्या स्वभावाचे सविस्तर वर्णन करा.

(३) कौटुंबिक माहितीचे कोष्टक भरताना चिमणरावाने बऱ्याच 'अनौचित्यपूर्ण' विसंगति करून ठेवल्या आहेत. उदाहरणार्थ, आई जीवंत असल्यास तिचे वय ५१ व आईची आई जीवंत असती तर तिचे वय ४६ दिलें आहे. पण आईहून आजी लहान कशी असू शकेल ? या तऱ्हेच्या आणखी कोणत्या विसंगति त्या कोष्टकात आहेत ?

(४) अपघात व आजारीपणाबद्दलचा वैद्यकीय दाखला यांविषयीच्या प्रश्नांचीं जीं उत्तरें आहेत त्यांत 'अनौचित्य' कोठे आहे ? ती वाचून तुम्हांला हसूं कां बरें आले ?

(५) प्रस्तावनेमधील प्रसंगनिष्ठ विनोदाबद्दलचें विवेचन पुन्हा वाचा आणि या गोष्टींतील प्रसंगनिष्ठ विनोदाची दोन उदाहरणें सांगा. ( विमाएजंटाला वधूपिता समजून चिमणराव त्याच्याशी चढाईखोरपणे वागतो तो प्रसंग आणि शेवटी त्याला कंपनीचें पत्र येतें तो प्रसंग हे नीट पाहा. )

✦ ✦ ✦

# माझे दत्तक वडील : ३ :

सकाळची रम्य वेळ होती, दिवस हिवाळ्याचे होते आणि मी रत्नागिरीच्या बंदरावर फेरफटका करण्यास गेलों होतों. कोकणांत हिंवाळ्याचे दिवस किती आल्हादकारक वाटतात ! फार थंडी नाही आणि उष्मा तर मुळीच नाही. रत्नागिरींचें बंदर चढण्याउतरण्यास जरी अवघड असलें, तरी तेथील देखावा फारच नामी आहे. समुद्राकडे तोंड करून उभें राहून पाहिलेला उजवीकडील तो अजगरासारखा पसरलला किल्ल्याचा डोंगर, समोर क्षितिजापर्यंत पाणीच पाणी आणि त्यावर अंतरा–अंतरावर तरगणाऱ्या गलबतांचीं परीटघडीचीं शिडें, मागील बाजूस माडांची घनदाट राई आणि डाव्या बाजूस विशेष सांगण्यासारखें कांही नाही, असा तो सुंदर देखावा जन्मांत मी विसरणार नाहीं. रात्रभर निशापाणी करून लालभडक झालेल्या भगवान् सूर्यनारायणाने आपली पत्नी सृष्टिदेवी हिचीं दोन्ही थोबाडें रंगविलेलीं होतीं. समुद्राकाठीं वाळूंत एका बिळांतून दुसऱ्या बिळांत सुर्कन पळणारे कुर्ले आपल्याला पकडावयास येणाऱ्या कावळ्याशीं किंवा कुत्र्यांशीं पकडापकडीचा खेळ खेळत होते. झालें इतकें वर्णन पुरे झालें; नाही तर लघुकथेचें तंत्र बिघडावयाचें. म्हणून मुद्याच्या गोष्टीकडे वळतों.

जरी मला पुण्यास नोकरी होती, तरी मी दरसाल या महिन्यांत रत्नागिरीस येत असें, व माझ्या वडिलोपार्जित इस्टेटीपैकी माझ्या वाट्याला

जें नारळाचें झाड व फणसाच्या झाडाची जी खांदी आली होती त्याचें वार्षिक उत्पन्न एक रुपया पांच आणे पाच पै घेऊन जात असें. हें उत्पन्न मिळविण्यास माझ्या वडिलांस आठ वर्षे कोर्टांत झगडून नऊशे रुपये खर्चावे लागले. मग मी सालिना पंधरावीस रुपये खचून रत्नागिरीस येऊन भाऊबंदांशीं तडून हे हक्काचे, हट्टाचे व मानाचे पैसे घेऊन जात होतों यांत वावगे काय झालें? तसें न करीन तर वडिलांच्या नावास बट्टा लागणार नाही काय? मीं हे यंदाच्या वाटणीचे पैसे कालच वसूल केले होते व आज संध्याकाळच्या बोटीने निघून परत पुण्यास जाणार होतों. बंदरावरची गमत घटकाभर पाहून परत फिरलों व वरल्या आळींत पोचलों. तोंच एक पन्नाशीच्या सुमाराचा वृद्ध गृहस्थ घाईघाईने मजकडे येत आहे असे पाहून थबकलों. तो गृहस्थ धावतच जवळ आला व त्याने माझ्या अंगाभोवती दोन्ही हात टाकून मला कवटाळलें.

" अहो, हें काय आजोबा? मला कोण म्हणून समजता? मी कांही तुमचा नातूपणतू नाही बरं. सोडा मला. नाही तर आता भोवताली घोळका जमा होईल तमासगिराचा. "

" बाळ, नको रे असा म्हाताऱ्याला झिडकारूं. तोच तूं—अगदी हुबेहूब! काडीइतका फरक नाही. "

" अहो भटजीबुवा. कबूल आहे सगळं. ता मी आहें. हुबेहूब काल दिसत होतों तसाच आजहि दिसतों आहें. कालचा हा चिमणाजी विठ्ठल—"

" काय, चिमण तुझें नांव! मग तर ठेर्पा जमलेंच. मलासुद्धा दृष्टान्तात गुरुराजानी हेंच नाव सांगितलें होतें. चिमण! चिमण! ये रे माझ्या चिमण्या बाळा!" असे उद्गार काढीत म्हातारबुवांनी मला अधिकच आवळलें.

" अहो शास्त्रीबुवा, तुम्ही सड्यावरच्या वेड्यांच्या इस्पितळांतून रखवालदारांच्या हातावर तुरी देऊन तर नाही ना आलां? चला, तिकडेच तुमची परत रवानगी करतों. "

" अरे बाळा, मी कोणाच्या हातावर तुरी देऊन आलों नाही. पण तूं मात्र माझ्या हातावर तुरी देऊन वीस वर्षे पळाला होतास! पण

सुदैव माझें, काल रात्रीं गुरुराजांनी दृष्टान्त देऊन सांगितलें की, ' तुझा बाळ उद्या सकाळीं तुला भेटलाच पाहिजे. ' मीं म्हटलें, ' पण त्याला ओळखणार कसा ? ' तेव्हा गुरुराजांनी स्वप्नांत तुझें दर्शन घडविलें आणखी ते अदृश्य झाले. स्वप्नांत पाहिलेली मनोहर मूर्ति – पण चल माझ्या घरीं. इथे रस्त्यात आता हे तमासगीर जमा होतील. हें कोकण आहे बाबा ! इथले लोक आहेत कुचाळ ! चिटोळांचा मुलूख आहे हा."



" ये रे माझ्या चिमण्या बाळा ! " असे उद्गार काढीत म्हातारबुवांनी मला अधिकच आवळलें.

या वेड्याच्या डोक्यात आहे तरी काय हें पाहावयाच्या उद्देशाने मी त्याच्याबरोबर त्याच्या घराकडे जाण्यास निघालों. दहापाच घरें गेल्यावर

त्याच्या घराच्या गडग्यांत शिरलों. आत गेल्याबरोबर तेथील थाट पाहून मी थक्क झालों. दोन तुडुंब भरलेल्या विहिरींस माळांचे रहाट लावले होते आणि एकास बैल व दुसऱ्यास रेडा जुपला होता. विहिरीच्या पाटाच्या पाण्यावर माड, सुपारी, कलमी आंबे, फणस, काजू, असे वृक्ष; चिकू, कॉफी, केळीं, कागदी लिंबें, अशीं झाडें; फुलझाडें, वेली, भाज्या यांची जोपासना होत होती. घरापुढील मांडवावर वाळवणें घालण्याचे कामीं दोन मोलकरणी राबत होत्या. दळणाकांडणाचें काम दुसऱ्या दोघी मोलकरणी करीत होत्या आणि एका गोठ्यांत पांचसहा गुरें बांधलेलीं होतीं. बागेच्या मध्यभागीं मुंबई–पद्धतीचा दुमजली सुरेख कौलारू बंगला होता.

" ही पाहा माझी बाग नि समोरचें माझें गरिबाचें खोपटें. " म्हातारबुवांनी सांगितलें. कोकणच्या श्रीमंत लोकांचा पोशाख व अठराविश्वे दरिद्यांचा पोषाख सारखेच असतात, म्हणून मला त्यांच्या बोलण्याचें मुळींच आश्चर्य वाटलें नाही. त्यांनी मला बंगल्यांत नेलें. बंगल्याच्या ओसरीवरच आम्ही झोपाळ्यावर बसलों. ओसरीवरून माडीवर जाण्याचा जिना होता त्याला कुलूप लावलेलें होतें, त्यामुळे दिवाणखान्याचा थाट मला पाहावयास मिळाला नाही; तरी ओसरीवरील गाद्या, लोड, तक्क्ये, देवादिकांच्या तसबिरी व इतर फोटो, पोतीचीं तबकें, चित्रें ठेविलेलें काचेचें कपाट वगैरे थाटावरून या म्हाताऱ्याच्या श्रीमंतीची बरीच कल्पना आली.

म्हाताऱ्याने रामा गड्यास हाक मारून बोलाविलें आणि माजघरांत टांगलेल्या केळवंडींतील थोडीं केळीं आणि एक पपनस घेऊन येण्यास सांगितलें.

रामा—" पन आन्ना—"

रामास पुरतें न बोलूं देतां म्हातारा त्यास गप्प करून म्हणाला, "होय, मालकांचेच पाहुणे आहेत हे, जा. जास्त बोलूं नको." रामा कांही तरी पुटपुटत गेला, तेव्हा म्हातारा मला म्हणाला, " पाहिलेत, हे कोकणचे गडी कसे उद्धट असतात! याना अहो जाहो कसें तें ठाऊकच नाही. बाकी मलाहि हा साधेपणा आवडतो. मला आण्णासाहेब म्हणूं नका,

नुसतें 'आण्णा' म्हणा अशी मीं त्यांना ताकीद देऊन ठेविली आहे. नाही तर तुमच्या देशावर जो उठला तो 'साहेब'! तात्यासाहेब, बापूसाहेब, भाऊसाहेब -- मग हातांत उलटी अंबारी का असेना! (ओरडून) अहो बाईसाहेब, जरा बाहेर या."

वेणी घातलेली, मोठें कुंकू, नाकांत सोन्याचे मणि गुंफलेली नथ, गुडघे झाकतील इतकेंच रुंद लुगडें, अशी बाई माजघरांतून, दारांत येऊन उभी राहिली. तिला उद्देशून म्हातारा म्हणाला, "हे पाहिलेत का हो आपले चिरंजीव! झालें कीं नाही माझें स्वप्न खरें! तूं मला खुळा समजलीस, स्वप्न लटकें म्हणालीस, पण स्वप्नांत पाहिलेलीच मूर्ति! नांवसुद्धा गुरुराजांनीच सांगितलेलें, 'चिमणाजी'! बाळ चिमण! आपल्या आयशीच्या पायां पड."

या वेडपट थेरड्याच्या कलानेच जरा घेऊ या असा विचार करून मी त्या बाईच्या पायां पडलों. "बरें आहे. मी थोडा चहा ठेवतें." —असें म्हणून ती आंत निघून गेल्यावर म्हातारा झोपाळ्यावरून उठला व भिंतीवरचा एक फोटो काढून मला दाखवीत म्हणाला, "चिमणराया; पाहा, पाहा, हीं गोजिरवाणीं बाळें! एकाहून एक सरस रत्नेंच होतीं, पण काळाला नाही तीं पाहवलीं! एन्फ्लुएंझाच्या साथींत आठ दिवसांत एकामागून एक गेलीं; आणखी आम्हाला म्हाताऱ्यांना निसंतान करून सोडिलें! (स्फुदत) पण जाऊ द्या तें. आम्हीं मुलांकरिता शोक करीत एक वर्ष काढलें तेव्हा कालच आमचे गुरुराज--"

"म्हजजे कोण बुवा?" मीं चौकसलें.

"माझे गुरु म्हणजे राजापूरचे पासोडेमहाराज. सत्पुरुष आहेत. तेच माझी करुणा ऐकून द्रवले. त्यानी मला पहाटे दृष्टान्त दिला. त्यांची ती सहा महिन्यांत अंघोळ न केलेली, तोंडांत गांजाची चिलीम धारण केलेली, अंगावर मळक्या पासोडीशिवाय चिंधूकहि नसलेली, बाह्यात्कारीं भ्रमिष्ट दिसणारी मूर्ति माझ्यापुढे प्रकट झाली आणि त्यांनी सांगितलें, 'बेटा आण्णा! कल फजर ऊठके गाड्याको हात लगावो और रस्तेमें जाव, तुमारे नजरको जो आदमी पहेला आवेगा वोही तुम आपना

लडका समझो. आगले जनममें वो तेरा लडका था.' मीं म्हटलें, 'गुरुवर्य, पण रस्त्यांत दहा जण भेटतील. कोणता मी आपला मुलगा समजूं?' तेव्हा त्यांनी माझ्यासमोर तुझी मूर्ति प्रकट केली. मी पुढे बोलणार तों जागा झालों."

इतक्यांत आण्णांच्या कुटुंबाने चहा, केळीं, पपनसाच्या फोडी वगैरे उपाहार आणि मुखशुद्धीकरिता ओली सुपारी आणिली. त्यांचा समाचार घेत असतां आण्णांनी आपल्या जमीनजुमल्याची कल्पना मला करून दिली. आण्णांच्याजवळ बरीच माया होती. तो बंगला, ती बाग, रत्नागिरी व संगमेश्वर तालुक्यांतील भातशेते, दरमहा तीनशे रुपये भाड आणणारें मुंबईचें लहानसें घर, शिवाय वीस हजाराच्या 'परमेश्वरी' नोटों —आणखी पाच हजारांचें युद्धकर्ज. असलें घबाड आयतेंच पदरात पडत असल्यावर कोणता शहाणा माणूस आण्णांच्या दृष्टान्तावर अविश्वास ठेवील? पासोडे-महाराजांचे उपकार आण्णांच्याऐवजी माझ्यावर मात्र पुष्कळ झाले यांत संदेह नाही.

" पण आण्णा, माझे वडील हयात नाहीत, मला दुसरा भाऊहि नाही. तेव्हा मला तुमचा दत्तक होतां येणार नाहीं बरें का?" मीं म्हटलें.

" अरे दत्तक नको न् फत्तक नको. तीं सगळीं थोतांडें आहेत. दत्तकाचें कलम केल्याने का खरें प्रेम होत असतें! फक्त तू आमच्यावर आईबापां-प्रमाणेच माया कर म्हणजे माझी सगळी माया तुलाच मिळेल. बरें, आता तूं उतरला आहेस कोठे? ( ऐकून ) वरच्या आळींतले जोग ते तुझे कोण लागतात?"

मीं आण्णांना माझी सगळी हकीकत सांगितली. मी पुण्यास नोकरींत असतों असें ऐकल्यावर ते म्हणाले, " अरे चिमणा, साठ टिकल्यांकरिता खर्डेघाशी करण्याचें आता तुला कारण नाही. परंतु मला जरा दम्याची व्यथा असल्याने एवढा पावसाळा आम्ही दोघें पुण्यास काढू. स्वतंत्र बिऱ्हाडच करणार होतों. पण आता तूं आहेसच. घरीं तुझी आयशी आहे ना? तुला उद्यां सोमवारीं कामावर रुजू व्हायचे असेल तर तूं आज रात्रीच्य बोटीने जा. मी इथल्या कामाची व्यवस्था लावून बुधवारीं निघून येतों."

यानंतर कांही किरकोळ बोलणें होऊन मी निघालों. रविवारीं संध्याकाळीं रत्नागिरीहून निघून सोमवारीं दुपारीं पाऊण वाजतां पुण्यास पोचलों. वाटेने बोटींत व आगगाडींत माझा सर्व वेळ त्या भोळ्या आण्णाच्या अवाढव्य इस्टेटीची तजवीज करण्यांत गेला. ऑफिसांत जाण्यास उशीर झाल्याने एका टॉमीचीं" दुरुत्तरें सहन करावीं लागलीं. " हरकत नाहीं, लालतोंड्या !" मी ( मनात ) म्हणालों, " तो थेरडा कोकण्या मला आपली इस्टेट देणारच आहे. मग कोण येतो तुझ्यासारख्या माकडांची चाकरी करायला ! "

संध्याकाळीं घरीं गेल्यावर आईला सगळी हकीकत सांगितली तेव्हा ती म्हणाली, " संभाळ हो बाबा ! नाही तर तो कोणी लफंगाबिफंगा असायचा—असल्या मसलतींत आपल्यासारख्या साध्या माणसांनी पडूं नये. "

" अग पण आई, मी का मसलतींत पडलों आहें ? त्या आण्णांच्या गुरुरायांनीच मला हिच्यात पाडलं आहे. ठीक आहे. या महागाईच्या दिवसांत हातभार लावला संसाराला आपल्या दैवानं ! "

गुरुवारीं सकाळीं आण्णा व त्यांच्या पत्नी ( त्यांना माई म्हणावयाचें) यांस स्टेशनवरून आणिलें. आण्णानी आमच्या आईसाहेबास आडव्यातिडव्या गप्पा मारून खूप खूष केलें, माईनी आईला आपली बहीण मानिलें व आण्णा हे माझे चुलते आहेत असें सर्वांना मीं सांगावें म्हणजे लोकांना दृष्टान्ताची कर्मकथा सांगावयास नको, असें ठरलें. आण्णांच्या बरोबर त्यांच्या कपड्यांच्या व दागदागिन्याच्या ट्रंका होत्या. पण त्यांच्या किल्ल्या कोठे तरी हरवल्या. त्यामुळे त्याना अंघोळीनंतर बदलावयाला चिरगुटेंहि नव्हतीं, म्हणून मी लगेच बुधवारांत जाऊन एक धोतरजोडी व इरकली लुगडें घेऊन आलों.

पहिल्या दिवशीं आण्णा व माई नवीन असल्यामुळे त्यांची बरदास्त उत्तमच ठेवण्यात आली होती. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आमचा गवळी आला, तेव्हा आम्ही दूध किती घेतों तें अण्णानी विचारिलें. सौ. ( माझें नुकतेंच लग्न झालें होतें ) म्हणाली, " एक शेर. " आण्णा उद्गारले,

" बस् एकच शेर ? अरे, तें कांही नको आता. तुम्ही अडीच शेर दूध सुरू करा. मलाच तर शेरभर दूध पोळीबरोबर खावयास लागतें. रे गवळी, सकाळीं अडीच नि रात्रीं दोन शेर आणींत जा हो. ( मला इंग्रजींत ) पैशाची काळजी नको."

मी—" छे, छे ! आण्णा, असें कसें होईल ? पैशाचं काय मोठंसं ! लागेल तितकं दूध घेऊं. (मनात –) खा थेरड्या ! माझ्या बापाचं काय जातं नुस्तं दूध पिऊन पोट फुगून मेलास तरी ? "

आण्णा आल्यापासून आमच्या राहाणींत पुष्कळ सुधारणा झाली. जेवतांना दोन कोशिंबिरी, एक फळभाजी, एक पालजाजी, भाकरी-ऐवजी पोळी, पोळीला तूपसाखर, सकाळदुपार लिप्टनच्या पिवळया डब्यांतील चहा व बरोबर बिस्किटें अगर शिरा, असा थाट सुरू झाला. आण्णांच्या डोकीवरचा पांढरा मास्तरशाही रुमाल जाऊन पुणेरी भिरभि, ळ्यांची पगडी, अंगातील बंडी व चेकचा कोट जाऊन शर्ट व सर्जचा कोट-पंचा जाऊन लांबरुंद धोतर व वहाणांऐवजी लाल पुणेरी जोडा, असा पेहराव आला. माईचें सुती लुगडें जाऊन इरकली लुगडें व त्यांच्या पूर्वींच्या अनवाणी पायांत गादीचे जोडे आले. हा सगळा वेषांतराचा खर्च तूर्त मला सोसावा लागला. पण याचा दसपट वचपा काढल्याशिवाय मी राहा-णार होतों थोडाच ?

आण्णा व माई हीं दररोज संध्याकाळीं तांगा करून फिरावयास जात सिनेमाचा प्रत्येक दिवशीं नवीन कार्यक्रम, प्रत्येक मंडळीचें नवीन नाटक प्रत्येकास रोजचें डॉक्टरचें औषध व पथ्याकरिता फळें किंवा डब्यांतील विलायती खाद्यें, यांचा सपाटा सुरू झाला. आण्णांनी आपल्या ट्रंकेच्या कुलुपाच्या किल्ल्या पाठवून देण्याबद्दल रत्नागिरीच्या कारकुनास दहा पत्रें लिहिलीं; पण त्याने दाद दिली नाही. त्यामुळे खर्चासाठी मला सेव्हिंग्ज बॅंकेंतले माझे १२० रुपये काढून आणावे लागले.

आण्णांच्या प्रकृतीला पुण्याची हवा चांगली मानवली. पहिल्याने दोन पोळयाहि जात नसत, त्या आता पाचसहा पोळया पचून पुन्हा फिरावयास

जाण्याच्या आधी उपाहार लागू लागला. माईहि नवऱ्याशीं पोळया अधिक खाण्याच्या बाबतींत पैज लावून जेवीत असत.

या जोडप्याचा बकासुरी आहार पाहून गुंड्याभाऊसदेखील[१२] आपली प्रकृति क्षीण होत चालली आहे असें वाटूं लागलें. तेव्हा त्यानें मला सुचविलें की, मीं आण्णांस लंघनमीमांसेचें पुस्तक वाचावयास द्यावें, ज्यांच्या घरीं पाहुण्यांचा सुळसुळाट असतो अशा घरवाल्यांनी या पुस्तकाची प्रत अवश्य संग्रहीं ठेवावी. मात्र आण्णांसारखे खमंग पाहुणे त्यांस बिलकूल दाद देणार नाहीत. तें पुस्तक वाचून आण्णा म्हणाले, "अरे चिमण, अगदींच टाकाऊ पुस्तक आहे हें. लंघनाची चिकित्सा, जर त्यांत वर्णन केली आहे इतकी बिनचूक असती तर हिंदुस्थानांत इतकी रोगराई वाढली नसती. कारण या देशांतले शेकडा ऐंशी लोक दररोजच लंघन करीत असतात !"

"आण्णा, हे लोक नुसते उपाशी राहातात. पुस्तकांतल्या नियमांप्रमाणे लंघन करीत नाहीत."

"अरे, मरो रे तुझें लंघन ! आम्हांला 'उल्लंघनमीमांसा' असली तर देस एखादी ! म्हणे, पोट दुखलं तर उपास करावा नि बस्ती[१३] घ्यावा ! तें कांही नाही. पोट दुखलें तर बचक बचक सुंठसाखर नि तूप घ्यावीं नि वेष[१४] लाडू करून खावे. मधुमेह झाला तर रोज गुळाच्या आठ पोळया अच्छेर तुपाशीं खाव्या नि शभर नमस्कार घालून पचवाव्या. डोकें दुखत असलें तर चांगला अच्छेर मावा साखरेंत परतून खावा की साफ ! बद्धकोष्ठ झालें तर चारपांच बेसनाचे लाडू खावे नि वर एक गल्लास कोल्ड ड्रिंक घ्यावें. कालच त्या कँपातल्या ट्रेचर कंपनींत कोल्ड ड्रिंक घेऊन आलों. वाः ! काय त्याची खुमारी सांगू तुला !"

हळूहळू दोन महिने संपले. माझें सेव्हिंग्ज बँक-खातें खलास झालें. पगार दोनदाचा संपलाच होता. पण अद्याप आण्णांच्या किल्या येईनात; तेव्हा त्यांनी पांचशें रुपये रजिस्टरनें ताबडतोब पाठवून देण्याविषयीं रत्नागिरीच्या आपल्या कारकुनास लिहिलें व ते येईपर्यंत खर्चास मी सासऱ्याकडून दोनशे रुपये उसने आणिले. आण्णांचे पांचशें रुपये येतांच

सौ.ला सुरेख लुगडें मिळणार होतें. बिचारीला लढाईच्या महागाईने चिटांवरच समाधान मानून घ्यावें लागत होतें.

पंधरा दिवस होऊन गेले तरी रजिस्टर येईना ! पोस्टांत चौकशी केली, पण व्यर्थ. तेव्हा मी आण्णांस सुचविलें की, तुम्ही आता ट्रंकांस दुसऱ्या चाव्या लावून पाहा. मी चावीवाल्याला बोलावतों. पण व्यर्थ. चिक्कू म्हातारा पत्रें व तारा यांत पैसे घालवीत होता, पण तेथल्या तेथे दुसऱ्या चाव्या विकत घ्यावयाला त्याचा धीर होईना.

पावसाळा संपला; आगबोटी चालू झाल्या. तेव्हा माझ्या श्वशुरांनी मला सल्ला दिला की, मीं प्रत्यक्ष रत्नागिरीस जाऊन त्या म्हाताऱ्याच्या कारकुनास भेटावें व त्याच्याकडून पैसे आणावे. ही हकीकत मी आण्णांना सांगितली. तेव्हा ते बरेच आढेवेढे घेऊं लागले. " तुला रजा मिळणार नाही. पंधरा दिवसांनी मीच जाईन. तुला कारकुंडा दादच देणार नाही." —इत्यादि. तेव्हा आईनेहि मला बाजूस नेऊन म्हाताऱ्याला न कळवितां रत्नागिरीस जाण्यास सांगितलें व त्याप्रमाणे खोटी आजारचिठ्ठी ऑफिसांत पाठवून मी रत्नागिरीस गेलों. संध्याकाळी तेथे भाऊचंदांकडे उतरलों व त्यांस आण्णांचा वृत्तांत सांगितला. आण्णा फाटक नांवाचा श्रीमंत गृहस्थ रत्नागिरींत असून आपल्याला त्याची कांही माहिती नसल्याबद्दल त्यानी आश्चर्य प्रकट केलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी आण्णांच्या बागेंतील बंगल्यांत गेलों. पूर्वी मी येथे आलों होतों तेव्हा बंगल्याच्या माडीस कुलूप होतें; परंतु या वेळीं आण्णा पुण्यास असून ती उघडी असल्याने मला नवल वाटलें. चिक्कू मालकांची संपत्ति इतरांच्या चैनीसाठीच असते मी ओसरीवर गेलों व पाहातों तों झोपाळ्यावर तीन सुरेख मुलें बसलेलीं ! ही भुताटकी तर नाही ना, असें मला वाटलें. कारण ज्या मुलांचा फोटो दाखवून ' हीं माझीं गोजिरवाणीं बाळें एन्फ्लुएंझाच्या साथींत गेलीं' असें आण्णा म्हणाले होते तींच हीं मुलें. पोषाखहि तेच होते. सगळयांत मोठ्या मुलाने झोका थांबवून मला ' कोण पाहिजे' असें विचारिलें. मीं भीतभीत उलट मुलासच त्याचें नाव विचारिलें.

" माझं नांव प्रभाकल बाल क्रिष्न नाडकलनी. "

मी घर चुकलों कीं काय असें वाटून इकडे तिकडे बघूं लागलों. तों एक तरुण बाई तेथे घरांतून आली व 'काय, कोणाकडे आला आहां ?' —असें मला विचारूं लागली.

" फाटकांच ना हें घर ? "

" नाही बाई. हें आमचं—नाडकर्ण्यांचं घर आहे. फाटक तर इथं नाहीत जवळपास कोणी. "

मजकरिता केळीं व पपनस आणण्यासाठीं आणांनी ज्याला पाठविलें होतें तो रामा गडी तेथे कांही कामाकरिता आला व माझेकडे पाहातांच " काय पाव्हणे, कसा काय ? " असें त्याने विचारिलें.

" ठीक आहे. पण ते आण्णा कुठे आहेत रे ? "

" तो आण्णा बामण ? कुठें पलाला त्याचा कांहीच पत्ता नाय्. "

" म्हणजे ते आण्णा या बंगल्याचे मालक नव्हते ? "

" अवं, कसले मालक ? वैनीबाईस्नी पुसा म्हणजे त्या सांगतील सगला. " रामाच्या उपदेशाप्रमाणे नाडकर्णीण वाहिनींना मीं आण्णांबद्दल माहिती विचारिली.

" तो आण्णा शिफारस घेऊन इकडे नोकरी मागायला आला. त्याला आम्हीं कारकून म्हणून ठेवलें. मध्ये आम्ही लग्नाकार्याकरिता मालवणास गेलों ते त्याच्या अंगावर घर टाकून गेलों. कोणाला तरी माहीत थेरडा असा लबाड असेल म्हणून ? मेला आम्ही परत यायच्या आंत इथून पसार झाला न् बरोबर घरांतलीं दहावीस चादीचीं भांडीं न् कपडेय पळवलीन्.—तुम्हांला काय, त्यांनी आपणच घराचे मालक आहों, म्हणून सांगितलीन् ? काय बाई तरी धारिष्टय ! "

" आई, आणखी माझा गडवा पण पलवला ग त्यांनी. " तो मोठा मुलगा म्हणाला.

आता स्वतःची फजिती त्या बाईपुढे काय सांगावयाची ? त्या म्हाताऱ्याची झडती घेऊन तुमचीं भांडीं परत करतों असें सांगून मी निघालों. संध्याकाळच्या बोटीने रत्नागिरी बंदर सोडलें. काय पाजी माणसाने मला बनविलें ! आता कसली इस्टेट ? उलट चारपांचशे

रुपयांच्या उधाऱ्या मात्र करून बसलों ! मी माझ्या मित्रांत उपहासविषयें होणार ! पुण्यास घरांत पाऊल टाकतांच त्या थेरड्याच्या बत्तिशीपैकी शिल्लक राहिलेले दात न पाडीन तर नांवाचा चिमणराव विठ्ठलच नाही, असे सुडाचे विचार मनांत घोळवीत रात्र व सकाळ घालवून दुसऱ्या दिवशीं दुपारीं पुण्यास पोचलों.

तांग्यांतून उतरतांच, " कुठे आहेत ते आण्णा ? "—असें म्हणत मी घरांत शिरलों.

" अरे, असं झालं तरी काय रागवायला ? "— असें आईने विचारलें.

" पण आधी तीं थेरडा – थेरडी——"

" अरे, तीं गेलीं रत्नागिरीला. तूंच तिथून त्यांना तार केली होतीस ना झटपट निघून या म्हणून ? "

" मीं—मीं तार केली ! अगदीं पक्का लफंगा दिसतो आहे ! पण मी रत्नागिरीला गेल्याचं त्यांना सांगितलं कुणी ? "

" अरे, तुझ्या बायकोनं. भोळी बिचारी ! आपला बेत तिला माहीत नव्हता. तिनं त्या म्हातारीजवळ सहज सांगितलं. मग चार तासांनी, ' तुझी तार आली आहे, आपण रत्नागिरीस जातों ' असं सांगून तीं दोघें तिनाच्या गाडीनं गेलीं. दोन ट्रंका बरोबर नेल्या. आणखी दोन वर आहेत."

" पाहूं बरं त्यांत काय आहे ! चोराच्या हातची लंगोटी ! " असें म्हणून मी वर गेलों व हत्यारांनी कुलपें फोडीत फोडीत आईस सर्व हकीकत सांगितली. कुलुपें फोडून ट्रंका उघडून पाहातों तों आंत दगड व विटकरीशिवाय कांही नव्हतें !

दुसऱ्या दिवशीं टपालाने पत्र आलें. त्यांत पुढील मजकूर होता:—

" चि. चिमणराव यांस आण्णा फाटक याचे प्रेमपूर्वक आशीर्वाद. आपण आमचा चार महिने उत्कृष्ट पाहुणचार केलात याबद्दल आम्ही आपल्यांला दुवा देतों. राहिलेल्या आयुष्यांत आपली आठवण व्हावी म्हणून आपल्या कुटुंबाच्या पाटल्या बरोबर आणिल्या आहेत. तसेंच आपल्या कापडवाल्याकडून ६० रुपयांचें कापड आणलें आहे, त्याचे पैसे

फेडणें आपल्यावरच आहे. आमच्या अफाट इस्टेटीपैकी दगडविटांनी भरलेल्या दोन ट्रंका आपल्यांला वारसा म्हणून ठेविल्या आहेत, त्यांचा स्वीकार करावा. आपण स्वत:चें घर बांधाल तेव्हा त्यांचा अवश्य उपयोग करावा. आपल्या मातुश्रीस नमस्कार व चि. सौ. सूनबाईस आशीर्वाद. तुमच्यासारखें दुसरें भोळें सावज मिळेपर्यंत तरतूद झाली आहे. तरी आमच्या योगक्षेमाची काळजी करूं नये. कळावें, हे आशीर्वाद.

आपला,

**आण्णा फाटक"**

✦ ✦

## टीपा

(१) कुर्लें – खेकडे. (२) मितव्यय म्हणजे काटकसर हें लघुकथेचें महत्त्वाचें तंत्र मानतात. लघुकथेंत पात्रें, प्रसंग, वर्णनें वगैरेंची उधळपट्टी करतां कामा नये. सर्व कांही माफक प्रमाणांत हवें. म्हणूनच चिमणराव लांबलेलें वर्णन थांबवितो. (३) ठेपी – अगदी, पुरेपूर. (४) सडा – उंचावरील माळजमीन. (५) चिटोळ – कुचाळखोर. (६) गडगा – दगडावर दगड ठेवून कुंपणासाठी उभारलेली भिंत. (७) पोतीचीं तबकें – बारीक मणि गुंफून केलेल्या शोभेच्या तसबिरी. (८) उलटी अंबारी – झोळी. तिचा आकार उलटया अंबारीसारखा असतो. (९) आयशी – आई. (१०) परमेश्वरी नोटा – प्रॉमिसरी नोटा, पैसेफेडीबद्दलचीं आश्वासनपत्रें. (११) टॉमी – इंग्रज सैनिक. ( चिमणराव लष्करी जमाखर्चाच्या कचेरींत कारकून होता, हें लक्षांत घ्या. ) (१२) गुंड्याभाऊ हा चिमणरावाचा तालीमबाज, खादाड व आडदांड मामेभाऊ. (१३) बस्ती – एनिमा. (१४) बेष – चांगलें, छान. (१५) उपहास – टाकून बोलणें.

## अभ्यास

(१) चिमणरावानें केलेलें कोकणांतील आपल्या उत्पन्नाचें वर्णन आणि आण्णा फाटकांनी केलेलें आपल्या गुरुमहाराजांचे वर्णन यांमध्ये लेखकानें कोणत्या गोष्टीवर आडून टीका केली आहे ?

(२) दुसऱ्याचे अनुकरण करावे आणि त्यात त्याचे दोष स्पष्ट करावे हा विडंबनाचा विनोदप्रकार तुम्हाला माहीत आहे. या गोष्टीत आण्णा फाटक, रामा गडी व नाडकर्णी बाई यांच्या भाषेतील कोणते शब्ददोष लेखकाने विडंबनपद्धतीने स्पष्ट केले आहेत ?

(३) दुसरी कथा व ही कथा यात चिमणरावाच्या स्वभावाच्या दृष्टीने व घडणाऱ्या प्रसगांच्या दृष्टीने कोठे कोठे सारखेपणा आहे ?

(४) आपण अपेक्षा करावी एक आणि घडावें भलतेंच, असें या कथेत वारवार होतें. बंदरावर भेटलेला म्हातारा कगाल असावा, असें प्रथम वाटतें; पण पुढे तो श्रीमत वाटू लागतो. या प्रकारे जेथे जेथे अपेक्षाभंग होतो ती स्थलें हुडकून काढा. तुम्हाला सर्वात आवडलेलें अपेक्षाभंगाचे स्थल कोणतें ?

(५) या गोष्टीवरून चिमणरावाच्या स्वभावाबद्दल तुम्हांला काय वाटतें ? त्या स्वभावांत कोणती गोम आहे, की जीमुळे हसू उत्पन्न होते ?

✦ ✦ ✦

## वशिला लावण्याची सक्त मनाई : ४ :

चि. मोरू[1] मॅट्रिक झाला; त्याला कॉलेजांत प्रथम वर्षाच्या वर्गात घातलें. प्रथम वर्ष होतांच 'ज्ञान (आर्ट्स) कीं विज्ञान[1]' हा प्रश्न माझ्या धनहीनतेने चुटकीसारखा सोडवून विज्ञानाच्या वाटेस न जाण्याचें ठरविलें. आणखी तीन वर्षांनी तो बी.ए. झाला. आता मात्र 'पुढे काय?' हा प्रश्न दत्त म्हणून उभा राहिला. ध्येयाचा मार्ग आक्रमीत राहाणें सोपें पण ध्येयसिद्धीचा उपभोग घेणें कठिण असतें, असें प्रसिद्ध मुशियन तत्त्वज्ञ ओकाबोकी[3] याने म्हटलें असल्याचें मीं एका व्याख्यानांत ऐकिलें होतें, त्याची आठवण झाली. मोरू बी.ए. झाल्यावर एम्. ए. आणि एम्. ए. झाल्यावर पीएच.डी होईपर्यंत वाट पाहाण्याचें आर्थिक सामर्थ्य मला नव्हतें. 'तूं आता नोकरी कर' असा स्फूर्तिदायक संदेश मीं मोरूस दिला.

मोरूने जागोजाग अर्ज पाठविण्यास प्रारंभ केला; पण त्याची डाळ कोठे शिजेना. कांही दिवसांनी दैनिक पत्रांत खालील जाहिरात झळकली:—

## — पा हि जे —

न्यू लकी हायस्कूल ह्या संस्थेंत शिक्षकाचे काम करण्यासाठी इंग्रजी व संस्कृत विषयाच्या पदवीधरांनी अर्ज करावे. पगार प्रारंभी रु. ५०. गरजूंनी प्रिन्सिपॉलकडे अर्ज टाकावे. वशिला लावण्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष यत्न करणाऱ्या उमेदवाराचे अर्ज निकालीं काढण्यात येतील.

—प्रिन्सिपॉल

मोरूने ह्या जागेकरिता अर्ज केला. चारपाच दिवस झाले तरी उत्तर न आल्याने आम्ही दोघे उदास झालों होतों. गुंड्याभाऊ नेहमीप्रमाणे गप्पा मारावयास आला होता. त्याला अर्जाची हकीकत आणि त्याचें उत्तर न आल्याने आम्हांस वाटणारें औदास्य हीं निवेदन केलीं.

" चिमणाजीअप्पा, अरे नुसत्या अर्जांनी काम होत नाही अलीकडे. अर्जाला खटपटीचं पाठबळ लागत. ' सामर्थ्य आहे खटपटीचें, जो जो करील तयाचें 'असं सामर्थ्यांनीं सांगितलंच आहे. " गुंड्याभाऊ म्हणाला.

' शहाणा आहेस ! अरे जाहिरातींतच शेवटीं स्पष्ट लिहिलं आहे ना की, वशिला लावण्याचा कसलाहि यत्न केला तरी अर्जाला केराची टोपली दाखविली जाईल म्हणून ! ',—मी.

' ती पचाईत खरीच. ' गुंड्याभाऊ डोकें खाजवीत म्हणाला ' ही नवीनच सूचना हल्लीं यायला लागली आहे जाहीरातींतून. पण न्यू लकी हायस्कूलच्या कार्यकारी मंडळाचे सभासद तरी कोण आहेत तें कळूं द्या. बाप्पा मोरया, जरा इकडे ये पाहूं.'

माझा आज्ञाधारक ज्येष्ठ पुत्र समोर येऊन उभा राहिला. गुंड्याभाऊने त्याला न्यू लकी हायस्कूलच्या कार्यकारी मंडळाच्या सभासदांचीं नांवें विचारलीं.

मोरूने माहिती दिली. लष्करांत राहाणारे खानबहादूर हैबतखान पठाण अध्यक्ष आहेत; गुंड्याभाऊच्या प्राणान्तिक उपोषणाच्या वेळीं निवेदन प्रसिद्ध करणारे डॉ. मुंगळे, आमचे मित्र प्रो. हणमतराव हवालदार, शेठ सोराबजी पेस्तनजी खालीबाटलीवाला आणि देशभक्त गंगादास जमनादास गयावाले हे सभासद आहेत. अर्जदारांमध्ये चि. मोरूशिवाय मधुकर गणेश रबडे आणि के. नटेश अय्यर हे आहेत. आणखी कांही अर्जदार असल्यास त्यांचीं नांवें त्याला माहीत नव्हतीं.

कांही तरी नवीन युक्ति सापडल्यासारखा प्रफुल्लित चेहरा करून गुंड्याभाऊ म्हणाला,

'अप्पा, दे टाळी अन् कर माझ्या सुपीक डोक्याचं कौतुक!'

टाळी मीं होऊनच दिली. गुंड्याभाऊनें टाळी मागताच तत्परतेने मी देत असें; कारण मीं न दिल्यास तो मला टाळी देत असे आणि त्याची टाळी म्हणजे कांही आईनें पाठ थोपटणें नव्हतें. टाळी दिल्यावर तिचें कारण मीं त्याला विचारलें. 'अरे,अशी नामी कल्पना सुचली आहे की जिचं नाव तें. वशिला लावणाराचे अर्ज केरांत फेकून देणार ना?'—त्याने विचारलें.

'होय, एकदम त्या लोकांना नालायक ठरवून टाकणार.'—मी.

'तर मग आपण दोघे अन् आमचे बाबा असे तिघे मिळून प्रतिस्पर्ध्यांच्या नावांनी कॅन्व्हसिंग करू या म्हणजे ते आयतेच नालायक ठरतील अन् मोरू निवडून येईल!'—गुंड्याभाऊनें आपली युक्ति अभिमानानें सांगितली. मला तर ती फारच पसंत पडली. गुंड्याभाऊच्या तालीम करून सुदृढ झालेल्या खांद्यावर इतकें युक्तिबाज डोकें असेल अशी मला कल्पना नव्हती.

श्रीयुत धोंडोपंत दांडेकर यांना आम्हीं आपल्या कटांत सामील करून घेतलें होतें. सोराबजी शेटचा आणि धोंडोपंतांचा फारच गट्टी होती, कारण दोघांना बुद्धिबळांचा अतिशय शोक होता. के. नटेश अय्यर या उमेदवाराची शिफारस करण्याची कामगिरी त्यांच्यावर सोंपविली होती. धोंडोपंत सकाळच्या वेळीं सोराबजींकडे गेले आणि त्यास त्यांनी साहेबजी[१८] केला.

'माहेरजी, धोंडूपंत! आज सकाळच्या प्रहरीं कोणीकडे झुकली स्वारी?' —शेटनी विचारलें.

'अरे बाबा, देवाच्या दयेने मला स्वतःकरिता कुठे तोंड वेंगाडायची वेळ येत नाही; पण विकतच श्राद्ध घेऊन तर्पण करावयाची खोड लागली आहे ना आम्हाला! तूं त्या कुठल्याशा सोसायटीच्या गव्हर्निंग बोर्डात[11] आहेस ना?' —धोंडोपंत

'अरे धोंडूपंत, मी पंचवीस सोसायट्यांच्या गव्हर्निंग बॉडींत आहें; अन् दहा इन्स्टिटयुशन्सचा प्रेसिडेंट[12] आहे. सगळ्याची यादहि मला राहात नाही. त्यातली कोणती तुला पाहिजे?'

'अरे, ती नव्हे का वॉन्टेडची[13] जाहिरात दिली आहे —' धोंडोपंत चंची सोडीत सोडीत म्हणाले.

'हा हा, ते न्यू लकी हायस्कूल असेल. त्यांत एक मास्तर नेमायचा आहे खरा.'—तपकिरीच्या डबीवर टिचक्या मारीत शेटजींना आठवण झाली.

"अरे, तेच. आमच्या चिरंजीवांचे एक दोस्त आहेत, त्याची नेमणूक करा, असे सांगायला मी आलों होतो.'

'नाव काय त्याचे? करून टाकू त्याची नेमणूक. तुम्ही आमचे रोजच्या बैठकीतले अन् कधी कोणाची भलामण न करणारे. सांगून जा त्याचं नाव—' तपकिरीची चिमूट नाकांत कोंबीत शेटजी म्हणाले.

'नाव मात्र विसरलो. डायरींत लिहून ठेवणार होतो पण खात्रीनं विसरणार नाही असे वाटले; पण नावाशी तुला काय करायचं आहे? तें अर्जांत लिहिलेलंच आहे. विसरूं नको हं!'—इतका वेळ तयार करीत असलेली पट्टी तोंडात ढकलून आणि तंबाकूची चिमटी तयार करीत पंतांनी बजाविलें.

'बराबर ध्यानात ठेवीन हं. पण नाव सांगून ठेवा—' असें धोंडोपंतास बजावून शेटजी दुसऱ्या कामाकडे वळले.

ही हकीकत पंतानी स्वतःच फुशारकीने आम्हांस सांगितली. के. नटेश अय्यरचे नाव सोराबजीस सांगण्याऐवजी मोरूचेंच त्यानी सांगितलं नाही एवढेंच भाग्य आम्हा समजलों!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं गुंड्याभाऊ आणि मी, खानबहादूर हैबतखान पठाण ह्याच्या बंगल्यावर गलों. मीं अगोदर आणि गुंड्याभाऊने दहा मिनिटांनी जायचें आणि परस्पराची ओळख नाही असें दाखवायचें असा आमचा ठराव झाला होता. मी बैठकीच्या जागेत जाऊन तेथे मध्यभागीं विराजमान झालेल्या खानबहादुरास सलाम वेलकम केला. खा.ब. हसले आणि म्हणाले, ' सलाम वेलकम नाही, सलामत आलेकम असं म्हणायला पाहिजे ! म्हणूनच संवस्कृतएवजी सगळ्यांनी पर्शियन सेकंड लॅंग्वेज[११] घ्यावी असं मी ठरवणार आहे बोर्डात. तुमच्या गमतीदार बोलण्यावरून अन् चेहऱ्यावरून तुम्हाला भेटल्यासारखी सय येती आहे. '

' हा साहब, मागे वडगावला बक्षीससमारंभ झाला त्यात मीं तुमच सोंग घेतलं होतं अन् तुम्ही स्वत:चेच सेक्रेटरी बनला होता. ' मी आठवण दिल्यावर ते बराच वेळ हसत राहिले.[१२]

' आज बहुत सालांनी आपली भेट होत आहे. आपणाला पाहून आम्हाला फार खुशी वाटली. काय काम घेऊन आले आहा?' — खा. ब.

घसा माफ करून मी भीतभीत म्हणालो, ' खानबहादूरसाहेब, न्यू लकी हायस्कूलमध्ये शिक्षकाची एक जागा खाली आहे, ती आपल्याच हातात आहे असं ऐकलं '

' बिलकूल बरोबर नाही. जागा खाली नाही. वर माडीवर आहे हें एक; आाण माझ्या हातात तर मुदलीं नाही, बघा.' आपले दोन्ही तळहात माझ्यापुढे धरून खानबहादूर विनोदाने बोलले.

खानबहादुराच्याकडे याचक या नात्याने आल्यामुळे त्याच्या विनोदाला मनमुराद हसणें हें माझें कर्तव्य होतें आणि तें मी शर्थीनिशी पार पाडलें.

' ताकाला जाऊन भांण्डें लपवण्यात काय मतलब आहे खानबहादूर? रबडे म्हणून अर्जदार आहे. फार गरीब आहे तो. त्याला आपण ही जागा दिली तर एका कुटुंबाला पोटाला लावायचं श्रेय आपल्याला मिळेल, खान-साहब बहादूर— ' असें मी नम्रतापूर्वक बोलत असता गुंड्याभाऊ दिवाणखान्यात येऊन माझ्यासमोर एका खुर्चीवर बसला.

त्याच्याकडे लक्ष न देतां खानबहादुरांनी विचारिलें, " काय हो राव-साहेब, हा तुमचा रबडे का डबडे कोणती परीक्षा पास झाला आहे ? "

' एम्. ए. झाला आहे, साहेब ' — मी.

गुंड्याभाऊने मध्येच तोंड घातले. ' मग तो मुळीच कामाचा नाही, साहेब. आपण तर बी. ए. झालेल्या इसमाची जाहिरात दिली आहे. मी बी. ए. झालेल्या इसमाची शिफारस करायला आलों आहे, खानसाहेब !'

' बरोबर बात केलीत वस्ताद. आम्हाला बी. ए.चीच जरूर आहे. तुम्ही कोणचं नांव घेऊन आला आहां ? '—खा. ब.

' के. नटेश अय्यर. मद्रासी इसम आहे. इंग्लिश तर हे मद्रासी लोक असं फाकड्डं बोलतात की,इंग्लिशांनीदेखील तोंडात बोट घालावं! '— गुंड्याभाऊ.

' ओ, यस, दीज् मद्रासीज् आर व्हेरी क्लेव्हर मॅन्स ! ' खानबहादुरांनी स्वतःच्या इंग्रजीचें प्रदर्शन करीत म्हटले, ' मिस्टर जोग, तुमच्या रबड्याचं नांव आम्ही नाही सपोर्ट[१७] करणार. बी. ए. झालेला मद्रासीच आम्हाला पसंत आहे. '

आपला कार्यभाग झाला असें दर्शवीत गुंड्याभाऊने ' थॅंक यू सर ' असें म्हणून खानबहादुरांचा निरोप घेतला. मीहि रबड्याची आणखी थोडीशी परपांगी शिफारस करून तेथून निघालों.

रस्त्यांत आल्यावर पुनः आमची जोडी जमली. डॉ. मुंगळे ह्यांच्या घराकडे मोर्चा नेण्याचें आम्ही ठरविलें. मधांची मसलत बदलून दोघांनी एकदम एकाच माणसाची शिफारस करण्याचें आम्हीं ठरविलें. मुंगळ्यांच्या समोर दोन खुर्च्यांवर आम्ही जाऊन बसलों. तेथे आधीपासून आलेल्या रोग्याला वाटेला लावून डॉक्टरनी आम्हांस, ' आज ही शृंगीभृंगीची[१८] जोडी इकडे कुठे वाट चुकली ? ' असें विचारिलें.

' आपल्याकडेच शाळेच्या कामासाठी आलों होतों, डॉक्टर. आपल्या न्यू लकी हायस्कूलध्ये एका मास्तराची नेमणूक करायची आहे. '—मी.

' त्या जाहिरातीच्याखाली वशिलेबंदीची सूचना दिली आहे ती तुम्हीं पाहिली असेलच. उगाच एखाद्याची शिफारस करून कां त्याला डिस्क्वॉलिफाय ( नालायक ) करतां !'–– डॉक्टर.

" आम्ही वाटेल त्याच्याजवळ शिफारस करीत नाहीं. तुम्ही आमचे फॅमिली डॉक्टर. आई वारली त्या वेळीं तुमचंच औषध तिला चालू होतं. ' मेलें तरी हरकत नाही; पण डॉ. मुंगळ्याचंच औषध घेईन ' असं शेवट-पर्यंत ती म्हणत होती. "--बोलतां बोलता गुंड्याभाऊच्या विशाल नेत्रांतून अश्रुप्रवाह वाहूं लागला.

' अन् तुम्हीं बीलहि ताबडतोब चुकतं केलं-' कबूल करतांना डॉक्ट-रांचा कंठ दाटून आला.

' म्हणूनच विश्वस्त रीतीनं तुमच्याजवळ भीड घालायला आलों. मधुकर गणेश रवडे ह्या अर्जदाराचीच तुम्ही नेमणूक करा, डॉक्टर. '-गुंड्याभाऊने अर्जावलें.

' रवडे तुमचा कोण ?'--डॉक्टर.

गुंड्याभाऊने सांगितलें, ' तो आम्हां दोघांचा आजेभाऊ लागतो. '

' व्हेरी गूड्. तुम्ही दोघे माझ्या दवाखान्याची चालती बोलती जाहि-रात आहां म्हणून रवड्याला मत द्यायच मी कबूल करतों. किती झालं तरी माझ्या मित्रांचा आजेभाऊ आहे तो. '

आमची युक्ति अंगलटीस तर येणार नाही ना, अशी भीति वाटून मी डॉक्टरांना वशिलेबंदीच्या सूचनेची आठवण दिली. ती सूचना स्वत:ची काळजी घेईल, असे डॉक्टरांनी उद्‌गार काढले

दुसऱ्या दिवशीं आम्ही दोघे गंगादास जमनादास गयावाले शेटजींच्या जवळ गादीवर बसून त्यांनी दिलेले विडे खात के. नटेश अय्यर, आमच्या ऑफिसांतील हेडक्लार्क कुक्कुरमुंडी सदाशिव अय्यर यांचा पुत्र, ह्याचा वशिला लावीत बसलों होतों. वशिला लावण्याकरिता येणारे लोक उमेदवाराची कशी नुकसानी करितात ह्या विषयावर गंगादास शेटजींनी गरम होऊन ताशेरा झाडला आणि ह्या भेटीमुळेच आपण अय्यरचें नांव अर्जदारांच्या यादींतून कमी करविणार असा दम दिला. फार खट्टू झाल्याचें सोंग करून आम्ही शेटजींचें घर सोडलें व रस्त्यांत येतांच आमची टाळाटाळी झाली. अगदी हाताला झिणझिण्या येईपर्यंत आम्हीं एकमेकांना टाळ्या दिल्या. रवडे

आणि अय्यर दोघेहि वशिलेशाहीमुळे नालायक ठरणार आणि मोरूला नोकरी मिळणार अशी आमची खात्री झाली.

ठराविक दिवशीं डायरेक्टरांची सभा झाली. सभेंतून ते परत येण्याच्या आधींच मुंगळ्यांची वाट बघत त्यांच्या दवाखान्यांत मी बसलों होतों. दवाखान्यांत शिरतांच मला बघून डॉक्टर म्हणाले, 'अभिनदन, चिमणराव !'




## काढा पेढे !

'कोणाची नेमणूक झाली ?'–मीं उत्सुकतेने विचारलें.

'तुमच्या शिफारशीच्या तट्टाची––एम्. जी. खडयाची. काढा पेढे !' – डॉक्टर.

माझें तोंड खरकन् उतरलें. 'अन् एम्. सी. जोगच्या अर्जांचं काय झालं ?'–मीं प्रश्न केला.

' जोग ? त्याचा अर्ज रिजेक्टेड झाला. बिचाऱ्याला कोणाची शिफारस नाही, अन् कोणाची ओळख नाही. तो कोण विचारात घेतो ? तुमच्या मुलाच्या नांवासारखं नांव दिसलं; पण म्हटलं, ' ज्या अर्थी तुम्ही रखडेची शिफारस करायला आलां आहां त्या अर्थी तुमच्या मुलाचा हा अर्ज नसला पाहिजे. नांवासारखीं नांव काय कमी असतात ?'

✦ ✦

## टीपा

(१) चि. मोरू हा चिमणरावाचा चिरंजीव दुसऱ्या कथेंत चिमणरावाचें लग्न झालेलें नव्हते. तिसरीत नुकतेंच झालेले होते. या कथेंत त्याच्या तरण्या मुलाचा उल्लेख आहे यावरून ही कथा बऱ्याच नंतरच्या काळातील आहे, हे लक्षांत येईलच. (२) कॉलेजमध्ये 'आर्ट्स' व 'सायन्स' असे दोन अभ्यासक्रम असतात पैकी पहिल्यात मराठी, इंग्रजी वगैरे भाषा व अर्थशास्त्र, तर्कशास्त्र, तत्त्वज्ञान इत्यादि विषय असतात. दुसऱ्यात पदार्थविज्ञान, रसायन, प्राणिशास्त्र आदिक विषय असतात. पहिला अभ्यासक्रम दुसऱ्यापेक्षा कमी खर्चाचा असतो. (३) मुशियन तत्त्वज्ञ ओकाबोकी ही एक काल्पनिक व्यक्ति आहे. (४) गुंड्याभाऊ हा चिमणरावाचा तिसऱ्या कथेंत उल्लेखिलेला मामेभाऊ. (५) औदास्य उदासीनपणा. (६) 'सामर्थ्य आहे चळवळीचें, जो जो करील तयाचें 'असें रामदासांचे वचन आहे. (७) गुंड्याभाऊच्या प्राणांतिक उपोषणाची मनोरंजक हकीकत तुम्हाला 'आणखी चिमणराव' या प्रा. जोशाच्या पुस्तकात मिळेल. (८) कॅन्व्हसिंग – मतें मागणे, प्रचार करणे. (९) हे गुंड्याभाऊचे वडील. (१०) साहेबजी हा शब्द पार्शी लोक नमस्कार करताना उच्चारतात. (११) गव्हर्निंग बॉडी – नियामक मंडळ (१२) इन्स्टिटयूशन – संस्था. प्रेसिडेंट – अध्यक्ष. (१३) वान्टेड – पाहिजे. (१४) अॅन – आणि. (१५) सेकंड

लँग्वेज – अभ्यासक्रमांत घ्यावी लागणारी दुसरी भाषा. (१६) 'चिमणरावाचें चऱ्हाट' या पुस्तकातील 'माझा सेकंड क्लासने प्रवास' या गोष्टीत हा हास्यकारक वृत्तान्त आहे. (१७) सपोर्ट करणें – पाठिंबा देणें. (१८) श्रृंगीभृंगी हे शंकराचे दोन सेवक होत. सारखवट असणाऱ्या व नेहमी बरोबर हिंडणाऱ्या माणसांना श्रृंगीश्रृंगी म्हणतात. (१९) रिजेक्ट होणे – नकार मिळून परत येणे.

## अभ्यास

(१) या कथेत कोणत्या सामाजिक दोषावर लेखकाने बोट ठेवले आहे?

(२) चि. सोन्यासाठी खटपट करणाऱ्या चिमणराव, गुंड्याभाऊ व धोंडोपंत या त्रिकूटाच्या स्वभावात काही तरी अनौचित्यपूर्ण कमतरता आहे. तीमुळे त्यांच्या खटपटीचे आपणास सारखे हसू येते. ती कमतरता कोणती?

(३) धोंडोपंत, सोराबजी, हैबतखान व डॉ. मुगळे यांच्यामधील अनेक छिद्रे उघड करून लेखकाने विनोद साधला आहे. ती छिद्रे कोणती?

(४) पुढील वाक्यामधील विनोद तुमच्या लक्षात आला का? आला नसल्यास त्या वाक्याचा संदर्भ पुन्हा पाहून त्यावर विचार करा.– (अ) 'पण नावाशी तुला काय करायचं आहे? ते अर्जात लिहिलेलंच आहे. विसरू नको हं!'... पंतांनी बजाविले (ब) 'बराबर ध्यानात ठेवीन हं. पण नाव सांगून ठेवा –' असे धोंडोपंतास बजावून शेटजी दुसऱ्या कामाकडे वळले. (क) 'बरोबर बात केलीत वस्ताद. आम्हाला बी.ए.चीच जरूर आहे.' (ड) 'ओ यस्, दीज मद्रासीज आर व्हेरी क्लेव्हर मॅन्स!' (इ) 'आई वारली तेव्हा तुमचंच औषध तिला चालू होतं.' (फ) 'तो आम्हा दोघांचा आजेभाऊ लागतो.'

(५) या कथेला शेवटी चटकदार कलाटणी कोणती मिळाली आहे? तीमुळे उत्पन्न होणारा विनोद कोणत्या प्रकारचा आहे? स्वभावनिष्ठ प्रसंगनिष्ठ की शब्दनिष्ठ?

✦ ✦ ✦

# वेड्यांचें इस्पितळ :५:

मी आपले अनुभव लेखरूपाने प्रसिद्ध करूं लागलों तेव्हांपासून मला ठिकठिकाणच्या गणपति-उत्सवांत व्याख्याने देण्यास आमंत्रणें येऊं लागलीं. एका जिल्ह्याच्या गावीं मी गेलों असतां गुंड्याभाऊ मजबरोबर आला होता. व्याख्यानास प्रारंभ होण्याला चार तास अवकाश असल्याने गावांतील प्रेक्षणीय स्थळांची चौकशी मीं उत्सवाच्या व्यवस्थापकांजवळ केली. व्यवस्थापक म्हणाले, " आमच्या गावांत प्रेक्षणीय स्थळ इथल्या वेड्यांच्या इस्पितळाशिवाय दुसरं कांगतहि नाहीं. तें पाहाण्याची परवानगी आम्हीं अगोदरच तुमच्याकरिता घेऊन ठेविली आहे. मात्र आमच्या गावाच्या नावाच्या उल्लेख न करण्याचं तुम्ही कबूल करीत असाल तर दाखविण्याची व्यवस्था करितों." मीं व्यवस्थापकांची अट कबूल केली. व्यवस्थापकांनी एका स्वयंसेवकाबरोबर आमची इस्पितळाकडे रवानगी केली.

परवानगीचा उपयोग करून आम्ही त्या मानसिक रोग्यांच्या आश्रमाच्या फाटकांत प्रवेश करितांच, कोटविजार व वहाणा पेहरलेला, खांद्यावर स्वच्छ टॉवेल टाकलेला, असा चाळिशी उलटलेला, पारशी गृहस्थ आम्हांस सामोरा आला व हस्तादोलन करून उद्गारला, ' या गृहस्थ हो, या– डॉक्टरसाहेबाचे पुण्याचे दोन मित्र येणार अशी बातमी मला अगोदरच कळली होती. प्रेक्षकांना इस्पितळ दाखवायचं काम नेहमी माझ्याकडे

असतं. तुम्ही वर्षादोनवर्षांकरिता आलां नसून तत्काळ परत जाणार आहां असं तुमच्या चर्येवरून दिसत !'

' नमस्ते. इथलीं निरनिराळीं वेडं पाहून स्वत:ला वेड नाहीं लागलं तरच तत्काळ परत फिरण्याची आशा! नाहीं तर इथच घ्याल आम्हांला ठेवून!' मी म्हणालों.

गुंड्याभाऊनें माझ्या समर्थनार्थ तुकारामबावाचा चरण म्हटला,

" वेड्यांचिया गावा जावें, वेडे होऊनिया यावें !"[६]

असें बोलतां बोलतां आम्ही एका वाफ्याजवळ जाऊन पोहोचलों. त्या ठिकाणीं उन्मत्ताश्रमाचा गणवेश धारण केलेला, पण डोळ्यांस चष्मा लावलेला एक आश्रमवासी हातांत सूक्ष्मदर्शक घेऊन पुन: पुन: जमिनीकडे पाहात होता. 'गुडमॉर्निंग रेगोसाहेब', आमच्या मार्गदर्शकानें त्यास म्हटलें.

' गुडमॉर्निंग पेस्तनजीशेठ. '– रेगोनें प्रतिप्रणाम केला.

' आता कसला प्रयोग चालला आहे आपला ! '



रेगोसाहेब

' प्रयोग कसला आपल्या नशिबाचा ! या गावच्या जमिनींत कांहीसुद्धा उगवत नाहीं. मीं धान्य लावून पाहिलं, फळझाडं लावून पाहिलीं, फुलझाडं लावून पाहिलीं, पण काहीच उगवत नाही ! काल संध्याकाळीं मीं इथं फुलझाडाचं बीं लावलं होतं सूर्यफुलाचं. कालपासून आतापर्यंत बारा वेळ पाणी घातलं, दहा वेळ माती बदलली आणि पाच वेळां उकरून पाहिलं; पण अजून एखादा कोंबदेखील फुटलेला दिसत नाही. माझी महत्त्वाकांक्षा अशी आहे, की झाडावर कलमें करून

वाटेल ती वस्तु झाडापासून आपल्याला मिळाली पाहिजे.' — आपला हात जमिनीवर आपटून रेगो म्हणाला.

गुंड्याभाऊने विचारिलें, 'आगपेट्या, घड्याळें, सदऱ्याच्या गुंड्या इत्यादि पदार्थ झाडांपासूनच मिळवायचे कीं काय?'

त्यावर तो म्हणाला, 'अलबत्, ह्या ठिकाणीं बाग-कामदार नेमला जाण्याच्या अगोदर (येथे पेस्तनजीनें डोळे मिचकावीत आमच्याकडे बघितलें) मी कलमबहाद्दर होतों. कलम म्हणजे लेखणी नव्हे. झाडाची कलम करण्यांत मी तरबेज होतों. आंब्याचं कलम निंबाच्या झाडावर आणि गुलाबाचं सोनचाफ्यावर करून मीं प्रदर्शनात बाक्षिसं मिळवलेलीं आहेत. पण उपयोग काय! सरकारची दृष्टि फार मर्यादित आहे. अमुक मर्यादेबाहेर मनुष्यानं शहाणपण दाखवू नये असं त्याला वाटत असतं!'

'त्याचा काय अनुभव तुला आला! तू म्हणतोस तितकं सरकार गैरइन्साफी[६] नाही. मात्र योग्य वाटेल त्याच्याकडे अर्जी गेली पाहिजे.' —पेस्तनजी बोलूं लागला तेव्हा रेगो मध्येच म्हणाला, 'झाली याची कटकट सुरू. हे पारशी लोक नेहमी सरकारची बाजू घेतात. मी आपली गोष्ट पुढे सांगतों. आमच्या कलमबहादुरींत आम्हीं असा विचार केला, फळझाडावर दुसऱ्या झाडाचं जर कलम होतं तर लाकडी फळांच्या झाडाचं कां होऊं नये? किंवा फुलझाडावर कागदी फुलांच्या झाडाचं कां होऊं नये? तें पाहा त्या पेरूवर लाकडी फळाच्या झाडाचं मीं कलम केलं आहे. आणखी ह्या कण्हेरीवर चिनी फुलवेलीचं कलम केलं आहे. हे माझे प्रयोग सक्सेसफुल[७] झाले म्हणजे सावंतवाडीचे लाकडी फळांचे कारखाने बसतील आणखी कृत्रिम फुलं करणारे चिनी लोक पटापट उपाशी मरतील!'

'म्हणून चीन सरकारांनी इंग्रज सरकारकडे केली तक्रार; आणखी रेगोसाहेबाला डांबवलं ह्या वेड्यांच्या धर्मशाळेत!'—पेस्तनजी हसत म्हणाला. त्याच्याकडे रागाने पाहात रेगो म्हणाला, 'कलम करण्याची विद्या मनुष्य-प्राण्यावर योजण्याची माझी कल्पना होती.'

'मग ती अमलांत आणली का नाहीं?'- मीं विचारिलें.

" सॅमूसनला त्याच्या बायकोनंच शत्रूच्या हवालीं केलं तसं मला माझ्या बायकोनं सरकारच्या हवाली केलं. माझ्या बायकोच्या डोळ्यांना शॉर्ट साइट[९] झाली. त्या डोळ्यांवर हरणाच्या डोळयाचं कलम करण्याचा माझा विचार होता. मीं तिला सांगितल, उद्या तुझे डोळे कापून हरणाचे डोळे तिथे बसवून तुला मी 'हरिणाक्षी' करणार. त्याबरोबर तिनं निमकहरामी करून ओरँगओटॅंगला बोलावलं. "—रेगो.

'हा रंग्या टंग्या कोण बोवा ?'—गुब्याभाऊने विचारलें.

पेस्तनजीने घाबऱ्या घाबऱ्या चहूकडे नजर फेकली आणि सांगितलें, की 'इस्पितळाच्या डॉक्टरचं हें वेड्या लोकानी ठेविलेलं नांव आहे.' एकंदरीने वेड्यांसहि बरीच विनोदबुद्धि असते म्हणायची !

'आम्ही हिंदी लोकानी शास्त्रीय शोध लावून जगांत डोकं वर करू नये असं सरकारला वाटतं'—रेगो.

'म्हणून असले शास्त्रज्ञ सरकारनं ह्या चार भिंतींच्या आड कोंडून ठेविले आहेत. आहे की नाही स्वारीचं वेड विलक्षण ! वा रे कलमबहादुर !' —पेस्तनजी त्याच्याकडे तिरस्काराने पाहात म्हणाला.

रेगो हातातील चाकू घेऊन पेस्तनजीवर धावला आणि 'तूं ओरॅंग ओटॅंगचा खुशमस्कऱ्या आहेस. स्वत: वेडा असून इतराना वेडा ठरवतो !' इत्यादि शिव्या देऊं लागला. पेस्तनजी दूर पळाला आणि दुरूनच आम्हाला बोलावूं लागला. रेगोशी हस्तांदोलन करून आणि शुभ-संध्याचिंतन[१०] करून आम्ही पेस्तनजीच्या दिशेस चालूं लागलों.

थोड्या अंतरावर एक पिंपळाचा पार लागला. एक चिंताग्रस्त दिसत असलेला, डोळे खोल गेलेला, उतारवयाचा वेडा त्यावर बसून सारखा बोटें घालून कांही तरी मोजीत होता. पेस्तनजींनी माहिती दिली, की त्या मनुष्याला भाऊबंदांनी बुडाविलें असून हा त्यांच्यावर खटलं भरतां भरतां वेडा झाला आहे. त्याचें नांव गणोबा पाटील.

'कसं काय गणोबा ? तब्यत बरी आहे ना !'— मीं त्यास विचारलें.

गणोबाचें आताच आमच्याकडे लक्ष गेलें व त्याने मला विचारिलें,

' काय पुणेंकर, हिते काय बघाया आलां ? '

वेड्याचें सूक्ष्म निरीक्षण पाहून गुंड्याभाऊ चमकला. ' तुम्हीं आम्हांला पुण्यास कधी पाहिलें होतें काय ? ' अशा गुंड्याभाऊच्या चौकशीस त्याने उत्तर दिलें की, आपण पुणें कधींहि पाहिलें नाही. पण पुण्याच्या माणसास चेहऱ्यावरून तत्काळ ओळखूं शकतों.

वेड्या लोकांचा वेडाचा एकच मुद्दा सोडल्यास बाकीच्या बाबतींत ते शहाण्याहून शहाणे असतात असा विचार पेस्तनजीने प्रकट केला.



गणोबा पाटील

गणोबाने विचारिलें, 'काय हो पुणेंकर, ह्या जावळी तालुक्याच्या कोडतात तुम्हींचा एखादा खटला आणला आहे जनू ? मी बारा वर्षं ह्या पाराखाली बसून चोपदाराच्या पुकारण्याची वाट बघतों आहे; पण अजून माझं नांव कोणी पुकारीत नाही. तुम्ही शहाणे असाल तर कोडताची पायरी चढूं नका. अरे, ही पहा पंजाब मेल आली एकदम सपाटे बंद. बाजूला व्हा नाही तर धक्का बसेल. '

गणोबाचा इशारा पूर्ण होण्याच्या आंतच मनुष्याच्या तोंडचा आवाज आमच्या कानीं पडला व आम्ही वळून पाहाण्याच्या आंतच गुंड्याभाऊ खाली पडून त्याच्या अंगास अडखळून एक धिप्पाड काळा देह पलीकडे कोलमडलेला दिसला. गुंड्याभाऊने उठून अंगावरची माती झाडीत त्या देहाच्या मालकास म्हटलें, ' अरे दोस्त, जरा बघून नाही का चालतां येत ? तूं जर वेडा नसतास तर तुझी हाडं खिळखिळीं केल्याशिवाय राहिलों नसतों. '

तो काळा मनुष्य आपला प्रचंड देह उभा करून आपले इस्पितळी कपडे झाडीत रागाने हिंदुस्थानींत म्हणाला. ' ए पागल, पंजाब मेलला अडथळा करून विलायतच्या टपालाची खोटी करितोस? तुझ्यावर हायकोर्टात खटला करतों बघ. '

पंजाब मेलचे धाकाचे शब्द ऐकून पारावर बसल्या बसल्या गणोबा तिरस्काराने हसून म्हणाला, ' अरे खुळचटा, हायकोर्टात खटला भरलास तर निकाल व्हायला लागतील बारा सालं, नि तुझी गाडी ह्या खतरूड स्टेशनावर बारा सालं कोकलत उभी राहील! दे सोडून त्याला. मार शिटी आणखी गाडी जाऊं दे आम्रा कॅन्टोन्मेंटला'' ! '



पंजाब मेल

पंजाब मेलने फुर्र्र्र अशी गार्डाची शिटी दिली, परंतु इंजिनाची शिटी लवकर होईना; कारण पेस्तनजी आपला डावा हात शरीराशी काटकोनांत करून उभा राहिला होता. पंजाब मेलने घुस्सा चढून, ' ए सिग्नल डाउन करो, पंजाबमेल को. खोटी होता है; समझता नही ब्लडी फूल ! ' असें म्हणतांच पट्कन सिग्नल पडला आणि पंजाब मेल शिटी फुकून अपघातात गमावलेला वेळ भरून काढण्यासाठी वायुवेगाने धापा टाकीत निघाली.

तुझें नांव आजच पुकारलें जाईल असें गणोबा कोर्टनाल्यास आश्वासन देऊन आम्ही इस्पितळाच्या इमारतींत शिरलों. इमारतीच्या प्रवेशद्वारापुढील

एका खोलींत, टेबलाशीं बसलेला एक रोगी हातात बदामाकृति प्लँचेटची[13] फळी घेऊन तिला जोडलेल्या लेखणीने कागदावर रेघोट्या ओढण्यांत गुंग झाला होता. रेघोट्या ओढून ओढून चिताड झालेले कागदाचे ढिगारे त्याच्याभोवती पडले होते या रोग्यास उन्मत्तांचा गणवेष दिलेला नसून युरोपियन पद्धतीचा पोशाक आणि डोक्यास पुणेरी पगडी असा त्याचा वेष होता. पेस्तनजीने आम्हांला त्याच्याजवळ नेऊन म्हटलें, 'गुड्मॉर्निंग प्रोफेसर भट !'

'गुड्मॉर्निंग पेस्तनजीकाका. मला पाहाण्याकरिता तुम्ही दररोज नवीन वल्ली घेऊन येतां ! आज कोणाला आणलं आहेत ?'– प्रोफेसरमजकूर वर मान न करिता पुसते झाले.

'हे पुण्याचे अऽऽ––'
–पेस्तनजी घुटमळले

'मी जाग अन् हे माझे मावस बधु गुंडो धोंडो दांडेकर लाठी-विशारद.'– मीं सांगतलें.

'वा ! तुमच्या जोडीचे पराक्रम आम्हाला चांगले अवगत आहेत. मी आहें निमग्न महत्त्वाच्या संशोधनकार्यांत. महाकवि भवभूतीचा[14] आत्मा प्लँचेटमध्ये आणून त्याच्या जन्मस्थळाचा निर्णय त्याच्याच हातून मी करविणार आहें. प्लँचेटसारखं विश्वसनीय विनिमयसाधन[15] उपलब्ध झाल असतां विद्वानांनी वाङ्मयांतर्गत नि बहिर्गत पुरावे[16] धुंडाळीत बसावं हें आश्चर्य आहे. मिस्टर आपलं हे,––' भट.



प्रोफेसर भट

'दांडेकर '– मी स्मरविलें.

'मिस्टर दांडेकर, तुम्ही बळकट आहां. ह्या प्लँचेटला एक हात लावा. मी ह्या बाजूनं लावतों. आता कोणी आवाज करूं नका!' असें म्हणून त्यांनी गुंड्याभाऊस समोर बसविलें आणि कांही वेळ ध्यानमग्न होऊन, मग ध्यानातून जागृत झाल्यासारखें करून ते भवभूतीच्या आत्म्यास बोलूं लागले, 'हॅलो, तूं कोण? महाकवि भवभूति काय?'

प्लँचेटने एकदम स्फूर्ति येऊन आपल्याखालच्या कागदावर कांही तरी आकृति काढिली. ती प्रो. भटांस 'हो' या अक्षरासारखी दिसली. लगेच विजयी मुद्रेनें त्यांनी सर्वांकडे पाहिलें आणि बोलण्यास प्रारंभ केला, 'हे कवीश्वरा! तूं स्वतःला पद्मपूरचा म्हणवितोस, पण हें तुझें पद्मपूर पुण्याच्या पद्मावतीच्या तळयाजवळ होत कीं विदर्भात होत, किंवा आमच्या छत्तीसगडांतल्या रतनपूरजवळ? ह्या प्रश्नाचं उत्तर देऊन संशोधकांच्या मधला तंटा दूर कर!'

'अहो आचार्य महाशय! आता जरा तो दिव्यसंदेशहारक आमच्या वाट्याला येऊं द्या की!' डोक्यास गवती हॅट, अंगांत एके काळीं उंची प्रतीचा असलेला पण आता विटून गेलेला सूट, गळ्याभोवती लालभडक नेक्टाय, पायांत जुनाट झालेला बूट, आणि डोळयांस हलक्या प्रतीचा जांभळा चष्मा घातलेला ठेंगणा आणि जाड पुरुष पलीकडील दालनांतून येऊन म्हणाला, 'अहो गीर्वाणविद्यासंशोधक![१७] तुमचा भवभूति मरून झालीं दीड हजार वर्षे. अजून त्याचा आत्मा अंतराळात घिरट्या घालीत असला, तर त्याचं पुण्य फुकट गेलं असं म्हणाव लागेल. त्यापेक्षा विस्कॉन्सिन युनिव्हर्सिटीचे वनस्पतिशास्त्राचे अध्यापक डॉ. नेव्हरवॉज[१८] नुकतेच परलोकवासी झाले, त्यांना मी बोलावतों. त्याचा मी आवडता विद्यार्थी होतो. वनस्पतिशास्त्रांतले कित्येक महत्त्वाचे शोध त्यांनी वेळेवर लिहून काढिले नाहीत म्हणून जग त्यांना मुकलं आहे. आपण लाविलेले शोध ते अवश्य मला सांगतील अन् त्यांच्या जोरावर मी डॉक्टरकी[१९] मिळवून दाखवीन!'

'ह्या बिचाऱ्याला डॉक्टरकी मिळाली नाही म्हणून याचं डोकं बिघडलं आहे.'— पेस्तनजीने हलक्या आवाजांत आम्हांला सांगितलें.

प्रोफेसर भट आणि नवागत वनस्पतिशास्त्राचा विद्यार्थी या दोघांनी प्लँचेट चालू केलें. दोन वेड्यांच्या दिव्य शक्तीचा जोर मिळतांच दिव्य लोकांतून भराभर नाना प्रकारचे संदेश येऊं लागले. परन्तु ते भवभूतीकडून येत होते, कीं डॉक्टर नेव्हरवॉजकडून, याचा वाद त्या दोघांत लागला आणि त्याचें पर्यवसान गुद्दागुद्दींत होण्याच्या आंत बंदीपालाने त्यांची ताटातूट केली.

इतक्यांत, कुऊऊऊ अशी जोराची शिट्टी वाजवीत आणि घाट चढावयाचा असल्याने लांब लांब भपकारे सोडीत पंजाबमेल वायुवेगाने तेथे आली आणि ती लाहोर–पेशावरकडे निघून गेली. ह्या वेळेस ती परदेशचें टपाल घेऊन जात होती असें चड्डीला टाचणाने अडकविलेल्या चिठोऱ्यावरून दिसत होतें.

आम्ही एका खोलींत शिरलों. तेथें टेलिफोनची फुंकणी हातांत घेऊन तबकडीवरील आकडे मागेपुढे फिरवीत बसलेला एक मनुष्य आम्हांस दिसला. 'हॅलो स्टेशनमास्तर, लाहोरचं तिकीट घेऊन आज किंवा काल कुणी तरुण गाडींत...काय ? ... काय म्हणतां तिकीटबाबूला विचारूं ? हॅलो तिकीटबाबू...'


टेलिफोनबाबू

तिकीटबाबूनंतर तिकीटकलेक्टर, गार्ड, पोलीस, कोतवाल, गुप्तपोलीस, दैनिक वर्तमानपत्रें ह्या सर्वांस त्या मनुष्याने संदेश पाठविले. एक चक्कर पूर्ण होतांच, पुन्हा स्टेशनमास्तरपासून दैनिक वर्तमानपत्रांपर्यंत दुसरा फेरा झाला. हें रहाटगाडगें दिवसभर चालत असे.

' ह्या बिचाऱ्याचा मुलगा लाहोरला जायला निघाला; पण वाटेंत अपघात

होऊन मरण पावला. तेव्हांपासून याचं डोकं फिरलं आणखी ह्या नकली टेलिफोनवरून सारखे संदेश पाठवीत असतो. '—पेस्तनजी.

इस्पितळावरील अधिकाऱ्यांची खाजगी ओळख असल्याने आणि स्त्री-विभागात एकच अंतेवासी[२०] असल्याने स्त्री-विभाग पाहाण्याची आम्हांस परवानगी मिळाली. पेस्तनजीबरोबर आम्ही दोघे स्त्री विभागाच्या दरवाजातून आंत शिरलों. तेथील अंतेवासी स्त्री सुमारें पंचवीस वर्षांची आणि स्वरूपाने नीटस दिसत होती. मात्र तिचे डोळे अगदी मालवलेल्या दिव्यासारखे निस्तेज झाले होते. एका लिंबाच्या झाडाखाली पारावर बसून गुलबशीच्या फुलांचा हार विणण्याचा ती यत्न करीत होती; परंतु फुलांची साखळी करण्याऐवजी तिच्या हातून फुलें विस्कळितच होत होतीं. नाकात सोनेरी मण्यांची नथ, केसांचा अंबाडा बांधून डोक्यांत खोवलेलें फूल, गळयांत काचेच्या मण्याचे कंठे आणि लुगडें चांगलें ठेवणीचें असा तिचा पोशाक होता. पेस्तनजीने सांगितलें, की गेल्या वर्षी ह्या बाईचा नवरा ' जयंती ' बोटीने मुंबईहून कोकणात जाण्यास निघाला, परतु जयंतीबरोबर त्याला जलसमाधि मिळाली. तुकाराम बोटींतील काही उतारू जसे सुखरूप परत आले तसा आपला नवरा अद्याप परत येईल अशी आशा करीत त्याच्या स्वागताकरिता हार विणीत ही वर्षभर बसली आहे.

आशा ! आशेपायीं लोक कसे वेडे होऊन जातात ! म्हणूनच कवीने म्हटलें आहे–आशाया: परमं दुःखं नैराश्य परमं सुखम् । महबूबजान नावाच्या कवयित्रीनेदेखील ग्रामोफोनमध्ये 'आता निराशा सुखाची ' असे अर्थपूर्ण उद्गार एकाच गाण्यात वारंवार काढले आहेत[२१]. ह्या बाईच्या डोळयादेखत तिचा नवरा मेला असता तर त्या वेड्या आशेला तिच्या हृदयात ठाणें मिळालें असतें काय ?

परंतु विधिघटना उलटी होती ! तिच्या हृदयालाच ठाण्यांत जागा मिळाली होती.

पेस्तनजींचा आवाज ऐकून आशेने वर मान केली. गुंड्याभाऊस पाहाताच आपला नवरा परत आल्यासारखें तिला वाटलें असावें. ती पेस्तनजीला म्हणाली, ' पिस्तमजी, तुम्ही कबूल केल्याप्रमाणे माझ्या

कारभाऱ्याला परत आणलेंत ना! फार चांगले आहांत तुम्ही!' मग गुंड्याभाऊकडे वळून ती म्हणाली, 'या हो कारभारी, समिंदरांत पोहुनशानी फार थकले असताल तुम्ही! हार घालितें आधी तुमच्या गळ्यांत; अन् मग चहा करिते गरमागरम!'

एरवी सैतानालाहि भीक न घालणारा गुंड्याभाऊ त्या अस्थिपंजर उरलेल्या निस्तेज बाईच्या बोलण्याने गांगरून गेला. पुरुषसमाजांत वीर केवढाहि धीट असो, तो बायकांच्यापुढे गोगलगाय बनतो असें नेपोलियन म्हणत असे. असें आमचे शेंडेमास्तर सांगत, त्याची मला आठवण झाली. आशा गुंड्याभाऊसमोर उभी राहून, तोंडाला पदर लावून लाजत म्हणाली, 'इश्श्य, हितंच काय मेलं उभं राहायचं? हिकडं बंगल्यात चला की!' गुंड्याभाऊ भीतीने आणि लाजेने लालबुद आणि घामाघूम झालेला दिसला. त्याला हाताने धरून आंत नेण्यासाठी आशा जवळ आली, तिने त्याच्या कोटाची बाही पकडली आणि कांही बोलणार इतक्यात तिच्या हाताला हिसडा मारून आणि 'चल सोड' असें ओरडून गुंड्याभाऊने धूम ठोकली ती थेट बाहेरच्या फाटकापर्यंत!

हा सगळा प्रकार ऐकून रखावालदारबाई तेथे आली. पेस्तनजीला पाहून ती म्हणाली, 'हा मेला पारशी रोजच्या रोज कोणाला तरी घेऊन इथे येऊन हिला सतावीत असतो. चल बया, आता तुझा मेलेला नवरा परत भेटणारा आहे का तुला?' असें बोलत ती आशेला घेऊन तेथून निघून गेली.

आम्ही दोघे फाटकाकडे परत येण्यास निघालों. येताना पेस्तनजी म्हणाला, 'पाहिलंत मिस्टर, दिवाण्या लोकांचं आयुष्य कसं असत तें! अन्‌बॅलन्स्ड माइण्ड (पासंग नसलेलें मन) एकाच बाजूला झुकत असतं. त्यांत दुसऱ्या बाजूला कांहीच विषय नसतात. इथ दुसऱ्यांची वेडं पाहून स्वतःचं वेड माणसाला कळूं लागतं आणखी तो बरा होतो. वेड म्हणजे तरी मनाचा रोगच आहे. योग्य व्यायाम आणखी औषधोपचारांनी तो दूर झालाच पाहिजे'

असें बोलत असतां आम्ही बाहेरच्या फाटकाशीं आलों. तेथे उभ्या असलेल्या गुंड्याभाऊशीं थट्टा करीत, ' काय रावसाहेब, चांगली मायाळू बायको मिळत होती ती सोडून पळून आलेत ?' असें पेस्तनजी त्यास म्हणाला. फाटकांतून आम्ही बाहेर पडतांच रखवालदाराने पेस्तनजीस अडविलें. पेस्तनजी चिडून त्याला शिव्या देऊं लागला. तेव्हा मीं रखवालदारास विचारिलें, ' काय हो हवालदार, ऑफिसरांचा अपमान करायला तुम्हीहि वेडे झालां कीं काय ? '

रखवालदाराने मला कानांत सांगितलें, ' रावसाहेब ह्या पेस्तनजीशेठला बाहेर जायचा हुकूम नाही. हाबी इस्पितळांतला एक वेडा आहे. '



पेस्तनजी

आम्ही हें ऐकून सर्द झालों. आम्हांलादेखील आता अडकवून ठेवणार नाहीत ना अशी शंका माझ्या मनाला चाटून गेली.

पेस्तनजी रागावून म्हणाला, ' रामजी, तूं ह्या पाहुणे लोकांला काय सागतो आहेस तें मला समजलं; पण हें बघा मिस्टर, मी ठासून अने[२२] गर्जून सांगतों, मी वेडा नाहीं. तिलकांनीबी गुन्हेगार नाही असें जितक्या मोठ्यानी सागितल नसेल तितक्या मोठ्यानी सागतें मी वेडा नाही.'

' मग इथे कसे सापडलात? '–गुंड्याभाऊने विचारिलें.

' सरकारचा वहीम, सरकारचा लोभ अने मत्सर.' शेठजींनी ठासून सागितलें, ' हें बघा मिस्टर, मी जगांतला एक मोठा संशोधक आहें. कमनशिबाने मी हिन्दमध्ये जन्माला आलों म्हणून पागलखान्यांत मला कोंडून ठेवलं आहे. कारण काय म्हणून नाही विचारलं ? '

' कारण काय ? '–आम्हीं दोघांनी विचारिलें.

‘ अहो उघड आहे ! माझ्या शोधांनी शेफील्ड अने बर्मिंगहॅमचे मोठाले लोखंडाचे कारखाने बंद पडतील अशी सरकारला भीति वाटली. हाच मी जर्मनींत नाही तर इटालींत उपजलों असतों तर किती तरी वाखाणणी झाली असती ! मी आगगाडीच्या किंवा मोटारच्या एन्जिनापेक्षा अशी नवी युक्ति शोधून काढली आहे, की ती अमलांत यायचा अवकाश, वाफेचीं इंजिनं हवेंत सुस्कारे टाकीत अफसोस करीत शेडमध्ये पडून राहातील; विजेच्या इंजिनांचीं शिंग गाभरलेल्या कुत्र्याच्या शेपटीसारखी खाली पडून राहातील; आणखी पेट्रोलच्या पंपाचा उपयोग कचऱ्याच्या पेटीसारखा करावा लागेल ! ओळखा पाहूं माझी युक्ति काय असेल ती ? ’

रखवालदार हसत म्हणाला, ‘ एंजिनला हत्ती जोडावा ! ’

रखवालदाराला त्याच्या वात्रटपणाबद्दल एक खुसखुशीत गुद्दा लगावून पेस्तनजी म्हणाला, ‘ अगदी बिनखर्चाची युक्ति आहे. एक फुटबॉलएवढा लोहचुंबकाचा गोळा एंजिनपुढे बांधून ठेवायचा ! एंजिन लोखंडाचं करायचं; गोळा जसजसा पुढें जाईल तसतसं एंजिन त्याच्या मागून खेचलं जाणारच ! ’

गुंड्याभाऊने शंका काढली, ‘पण शेठजी, तो गोळा पुढे कसा जाणार?’

पेस्तनजी हसत म्हणाला, ‘ एवढी साधी गोष्ट समजत नाही ? आणखी मला ठेवतात पागलखान्यांत अने तुम्हांला ठेवतात मोकळे ! न्याय आहे इंग्रज सरकारचा ! अरे दिवाण्यों, एंजिन मागून चालत असतं तें लोह-चुंबकाला पुढे ढकलील अने लोहचुंबक एंजिनला ओढीत नेईल ! ’

रखवालदाराने सांगितलें, पेस्तनजीने एक बिनकिल्लीचा आणि बिन-विजेचा पंखा तयार केला होता. एका जुन्या सायकलच्या चाकाला त्याने ताडाचे पांचदहा पंखे आडवे बांधले होते. पेडलच्या साहाय्याने चाक गरगर फिरविलें, की वाराच वारा सुरू व्हावयचा. त्याहून महत्त्वाचा शोध म्हणजे पेस्तनजीकृत स्वदेशी विमान हा होय. त्याकरिता त्याने चार गिधाडें पकडलीं. त्याच्या पायांना दोऱ्या बांधल्या आणि त्यांस तो लोंबकळला. दहा फूट उंच जातांच स्वारी खाली आपटली आणि विमानाचे अश्व दशदिशा पळाले...’

यापुढे पेस्तनजींचे पराक्रम ऐकायला मिळाले नाहीत; कारण रखवालदार जीव घेऊन पुढे व पेस्तनजी त्याला शिव्या देत आणि त्याच्या अंगावर धोंडे फेकीत मागे असे धावत धावत इस्पितळाच्या इमारतींत शिरून अदृश्य झाले.

✦ ✦

## टीपा

(१) ही गोष्टहि चिमणराव आपल्याला सांगत आहे. 'विमा एजंटास चकविणे' 'माझे दत्तक वडील' यांसारख्या स्वानुभवाच्या गोष्टी त्याने प्रसिद्ध केल्यावर त्यास व्याख्यानाची आमंत्रणे येऊ लागली. (२) गावाच्या नावाचा उल्लेख न करण्याची अट याच गोष्टीत चिमणरावांनी पाळली आहे का ? पृ. ५० ओळ २४ पाहा. (३) हे चरण तुकारामबोवांचेच आहेत. भावार्थ : वेड्याच्या संगतीत शहाण्यालाहि वेड लागते. (४) उन्मत्ताश्रम – वेड्यांचें इस्पितळ. (५) कलम – एका झाडाची फांदी तोडून ती दुसऱ्या झाडास चिकटवून जगविण्याची कृति. (६) गैर इन्साफी – अन्यायी. ही कथा इंग्रजी राज्याच्या काळातील आहे, हें ध्यानात घ्या. पार्शी लोक सरकारच्या बाजूचे बहुधा असतात असा तेव्हा त्यांच्यावर आरोप होता. (७) सक्सेसफुल – यशस्वी. (८) सॅम्सनला दैवी शक्ति प्राप्त झालेली होती. ती त्याच्या केसांत होती. डिलायलाने हे रहस्य त्याच्या शत्रूस सांगितले. (९) शॉर्ट साइट – डोळ्यांना अधूपणा येऊन दूरचें दिसेनासे होणे. (१०) शुभसंध्याचिंतन – गुड् ईव्हिनिंग (११) कॅन्टोन्मेंट – लष्करचा भाग. (१२) ब्लडी फूल – शतमूर्ख. (१३) प्लँचेट ही एक तऱ्हेची छोटी घडवंची असते. तिच्यावर हात ठेऊन मृतात्म्याचे स्मरण केल्यास ते प्लँचेटमध्ये येतात व आपल्या प्रश्नांची उत्तरे देतात, अशी समजूत आहे. प्लँचेट हातामुळे हलून त्याखालील कागदावर ज्या रेघोट्या उठतील तोच मृतात्म्यांची उत्तरें समजतात. हें सर्व थोतांड किंवा अंधश्रद्धेचें प्रकरण आहे. (१४)

भवभूतीने मालतीमाधव, उत्तररामचरित ही प्रसिद्ध नाटके लिहिलीं. (१५) विनिमय – देवघेव. (१६) वाङ्मयातर्गत पुरावे म्हणजे वाङ्मयांतील उल्लेख आणि बहिर्गत पुरावे म्हणजे शिलालेख, नाणी, ताम्रपट इत्यादी-मधील माहिती. (१७) गीर्वाणविद्यासंशोधक – सस्कृतातील विद्येचे संशोधन करणारा. (१८) डॉ. नेव्हरवॉज – डॉ. 'केव्हाच नसलेला'. (१९) डॉक्टरकी– मशोधनाबद्दल मिळणारी डॉक्टर ही पदवी. (२०) अतेवासी – रहिवासी. (२१) महबूबजान ही केवळ गाणारीण होय. पण तिला चिमणरावाने कवयित्री म्हटलें आहे. (२२) अने – आणि. (२३) दिवाणा – वेडा.

## अभ्यास

(१) या कथेंत रेगो, गणोबा पाटील व प्रोफेसर भट याच्या आडून लेखकाने समाजांतील कोणकोणत्या वेडांवर टीका केली आहे ?

(२) रेगो आणि पेस्तनजी याचे सर्व शोध पाहा व त्यांत विनोदाची मस्खी कोठे कोठे आहे ते हुडका

(३) ही कथा वाचीत असता मधून मधून विनोदासह करुणरसाच्या छटा केव्हा उमटतात ?

(४) या कथेतील दोन विनोदी प्रसग सागा व त्या प्रसंगात अनौचित्य कोठे आहे तें उलगडून दाखवा. गड्याभाऊ व आसा याची भेट आणि पेस्तनजी अखेर वेडा निघतो, या प्रसगाचा विचार करा.

◆ ◆ ◆

## गुंड्याभाऊचें दुखणें :६:

एकदा रविवारला जोडून कसली तरी दोन दिवसांची सुट्टी आली होती. गुंडयाभाऊ आणि मी जिवाची मुंबई करण्याकरिता तेथे गेलों. वास्तविक मुंबईस सौ. चिमूताईचें[1] बिऱ्हाड असल्याने तेथेच आम्हीं उतरावयास पाहिजे होतें. पण कोणाच्या घरीं उतरल्याने आपल्यांला पाहिजे तितकी स्वतंत्रता मिळत नाही; म्हणून आम्ही बोरीबंदरजवळ असलेल्या अमीर महाल नांवाच्या पथिकनिवासात उतरलों.

आम्ही रात्रीं आठ वाजतां मुंबईस पोचलों. अमीर महालातील सुग्रास भोजनावर भरपूर ताव मारून आम्ही रात्रीं नाटकाला गेलों. नाटक संपल्यानंतर बर्फमिश्रित लिंबाचें वायाळें सरबत प्राशन केलें. नंतर ट्रामगाडीच्या वरच्या मजल्यावर बसून अमीर महालांत परत आलों. असल्या कुपथ्याने दुसऱ्या दिवशीं सकाळीं गुंडयाभाऊला दहावीस शिंका आल्या आणि प्रकृतीबद्दल तितक्याच शंका आल्या. जरा कमीजास्ती झालें की गुंडयाभाऊची तब्येत बिघडे. मी अशक्त असून मला मात्र कांही होत नसे. कारण गुंडयाभाऊ पुष्कळ आहे आणि मी थोडा आहे. रोगाला मी पुरत नाहीं. गुंडयाभाऊचा देह रोगजंतूंच्या तोंडाला पाणी आणतो.

मी म्हणालों, 'गुंडू, आजचं लक्षण बरं दिसत नाही. इथं परक्या ठिकाणीं तूं आपली प्रकृति बिघडवून घेतलीस तर तुझी निगा राखायला-

देखील कुणी नाही. अमीर महालाच्या व्यवस्थापकाला विचारून एखाद्या चांगल्या डॉक्टराचं औषध घेऊन आलं पाहिजे. '

आम्हीं निवासाच्या व्यवस्थापकाकडे चांगल्या डॉक्टराचें नांव विचारलें. व्यवस्थापकांनी सांगितलें, ' आमच्या मुंबईत दोन प्रकारचे डॉक्टर आहेत. कांही जण विलायतेंत जाऊन पुस्तकांचे डॉक्टरें होतात, तर कांही औषधांचे. डॉक्टर आंबेडकरांना कोयनेलचेदेखील गुणधर्म माहीत आहेत कीं नाहीत कोण जाणे ! कित्येक कॉलेजांतसुद्धा डॉक्टर म्हणून मिरवणारे प्रोफेसर आहेत ! आता तुमच्या गुंडोपंतांना आजार झाला आहे, त्याला असले डॉक्टर उपयोगी नाहीत. आमच्या इमारतीच्या तळमजल्यावर डॉ. त्रिवेदी फार हुशार डॉक्टर आहेत. त्यांच्याकडून तुम्ही औषध घेऊन या.'

आम्ही चार जिने उतरून तळमजल्यावरील त्रिवेदी डॉक्टरांच्या दवाखान्यांत जाऊन रिकाम्या बाकावर बसलों. डॉक्टरसाहेब तरुण व गोरेगोमटे दिसत होते. एका हातांत त्यानी एक कादंबरी धरली होती आणि दुसऱ्या हातांत पंखा होता. आम्ही त्यांच्यासमोर जाऊन बसलों. त्यांचें लक्ष वेधण्यासाठीं खाकरलों. पण दोनतीन मिनिटें त्यांनी बेपर्वाईचा आव आणला. मग पुस्तकांतील प्रकरण संपविल्यासारखें करून त्यांनी तें खाली ठेविलें आणि मजकडे पाहून विचारलें, ' काय रावसाहेब, काय होतं आहे तुम्हांला ? '

गुंड्याभाऊ शेजारीं असतांना मी नेहमी आजाऱ्यासारखा दिसत असें. मी तोंडाने उत्तर न देतां गुंड्याभाऊकडे अंगुलिनिर्देश केला.

' आपण आजारीं आहात वाटतं ? ' त्यांनी गुंड्याभाऊस विचारलें.

' हें बघा डॉक्टर, तसा मी काही फारसा आजारी नाहीं. पण परक्या ठिकाणीं आलों आहें; तेव्हा थोडे कारण झालं तरी सावधगिरी बाळगली पाहिजे. '— गुंड्याभाऊ.

श्वासमापक नळी हाताळीत डॉक्टर म्हणाले, ' अरे बाबा, तुम्ही मुंबईतला नाही हे तुमची तन्दुरुस्तीच सांगती आहे. तुमच्यासारखा तगडा माणूस मुंबईत येऊन वर्ष झाला नाही तोच कृष्णसुदाम बनून जाईल. अरे, हत्तीइतकी मोठी जाफराबादी म्हैस आमचा लोक मुंबईत आणतों, तिचींबी

हाडं सहा महिन्यांत बाहेर दिसायला लागतात ! बरं, पण तुम्हाला काय अजीरण झाल आहे ?'

'अजीर्णच नाही; पण काल गेलों होतो नाटकाला --' गुंड्याभाऊ.

गुंड्याभाऊच्या छातीला श्वासमापक नळीचें तोंड चिटकवून डॉक्टर म्हणाले, 'ते कांही सांगू नको. तुम्ही बाहेरगावचे तात्या लोक मुंबईला आले, की नाटकाला जायचे, सिनेमा पाहायचे, चौपाटीवरच्या वाळूंत लोळायचे, हॉटेलांत जाऊन भजीया खायचे, आइस्क्रीम-कोल्डड्रिंकवर हात मारायचे, ट्राममधून रखडायचे—हें सगळं ठरलेलं आहे. आमच्या काकाचं काय नुकसान आहे ! तुम्ही लोक असा नाही करेल तर आमचा धंदा कसा चालेल ?'

आपला कार्यक्रम डॉक्टरांनी बिनचूक सांगितलेला पाहून गुंड्याभाऊस आश्चर्य वाटलें. 'जरा पडसं-खोकला झाला आहे; नाही डॉक्टर ?' —त्यानें आशेनें विचारलें.

डॉक्टर श्वासनलिकेंतून गुंड्याभाऊच्या आंतले आवाज गंभीरपणें ऐकत होते. त्यांचा चेहरा काळजीनें ग्रासल्यासारखा दिसूं लागला. 'रावसाहेब, ताप येतो का तुम्हाला ?'—त्यांनी श्वासमापक नळी बाजूला ठेवीत विचारलें व तापमापक नळी त्याच्या खाकेंत खुपसली. 'आपल्याला ताप येत नाही' असें गुंड्याभाऊ ठासून सांगत असतां त्यांनी ती नळी बाहेर काढली आणि तिजवरील आकडा बघून जीभ बाहेर काढली. 'अठ्याण्णव दशांश चार !'—ते उद्गारले.

'हा तर सामान्य अंक आहे, डॉक्टर !'—मी म्हणालों.

'अरे, सामान्य कसला आला आहे, तात्या ! हा मांसाहरी माणसांचं सामान्य आहे. हिंदुस्थानांतल्या शाकाहारी मनुष्यांचं उष्णतामान स्वभावतःच सत्त्याण्णववर असत नाही. बारीक ज्वर मुरला आहे, रावसाहेब, तुमच्या अंगांत ! उदीर जसा हळूहळू न जाणवतां घर पोखरतो, तसा ज्वर तुमचं सशक्त शरीर पोखरत आहे.'—डॉक्टर.

'माझं शरीर अन् रोग पोखरत आहे ?' तिरस्कारानें दात काढून गुंड्याभाऊ म्हणाला, 'अहो डॉक्टर, माझं वजन २१२ पौंड आहे. सध्या

दरसाल दहा पौंड तरी वाढत आहे. हें का पोखरलं जाण्याचं लक्षण आहे ?'

डॉक्टरने एखादी गोष्ट डोक्यात घेतली की रोगी कांही सांगो, डॉक्टर आपलें म्हणणें सोडीत नाही. 'ही तर देहाची सूज आहे सूज ! खरी ताकद नाही. नुसती चरबी वाढत आहे. तुमचं ब्लडप्रेशर किती आहे ?' -त्यांनी विचारलें.

गुंड्याभाऊने ब्लडप्रेशर हे शब्द कधीच ऐकले नव्हते आणि मीं पत्नीच्या दुखण्यांतच काय ते, ते ऐकले होते. डॉक्टरांनी त्याच्या दंडाला ब्लडप्रेशर मोजण्याचें घड्याळ बांधलें आणि त्यांतील संख्या पाहून दचकल्यासारखें करून त्याला सांगितलें, "च् च् ! तुम्हांला हाय ब्लडप्रेशर झालं आहे. तुम्ही सायकलवर बसूं नको, मेहनत करूं नको अन् जिने चढूं नको; उतरायला हरकत नाही. हाय ब्लडप्रेशर झालेल्या माणसानं सर्वदा मरायला तयार राहलं पाहिजे. 'ग्रहीत इव केशेषु मृत्युना'—' असं वागायला पाहिजे."

यमदूत आपल्या इतक्या सन्निध येऊन ठपले आहेत, अशी गुंड्याभाऊला कल्पना नव्हती. काळजीने त्याच्या तोंडचें पाणी पळालें. आम्ही दोघे कावऱ्याबावऱ्या चेहऱ्यांनी एकमेकांकडे पाहूं लागलों. इतक्यांत त्याला खोकला आला. घशाशीं अगदी खाकरा येऊन तो खोकला. खोकल्याचा आवाज लक्षपूर्वक ऐकून डॉक्टरांनी क्षितिजसमांतर रेषेंत मान हलवली आणि नापसंतीदर्शक आवाजात म्हटलें, 'छे-छे ! हा खोकला अशुभसूचक आहे. तुम्हांला टी. बी. ची भावना झाली आहे, रावसाहेब.'

'फार पुढं गेलेली अवस्था तर नाही ना ?'-मीं विचारलें.

'घाबरण्याचं कारण नाही. ही रोगाची प्रथमावस्था आहे. योग्य काळजी घेतल्यास आताच त्याचा बीमोड करता येईल.'-असें यमराज-सहोदरांनी आश्वासन दिलें.

'कसंहि करा, पण मला वाचवा, डॉक्टरसाहेब ! बरं झालं, मी मुंबईला आलों म्हणूनच माझा टी. बी. उघडकीस आला ! पुण्याचे कुटुंबवैद्य राजाभाऊ आहेत, त्यांना आमची प्रेतयात्रा निघेपर्यंत आमच्या रोगाचं निदान करतां आलं नसतं !' -गुंड्याभाऊ काकुळतीने म्हणाला.

'पुणा अने मुंबई ह्या ठिकाणच्या वैद्यकीय ज्ञानांत एका दसकडीचा फरक असायचाच. '—डॉक्टर.

'म्हणूनच पुण्याला आम्हांला औषधपाणी फुकटांत मिळतं; पण मुंबईत नुसतं डॉक्टरचं तोंड पाहायला दहा रुपये फी पडते ! '—मी.

माझ्यावर रागावून डॉक्टर म्हणाले, 'दसकडीचा असा अर्थ नाही. मुंबईच्या डॉक्टरला १९२१ साल्लांत जें ज्ञान होतं तें पुण्यांत पोचायला १९३१ साल उजाडतं. '

'म्हणूनच पुण्यांतलं साधारण आयुर्मान मुंबईतल्या माणसाच्या आयुर्मानापेक्षा दहा वर्षांनी अधिक असतं. '—मी.

'तुम्ही पुण्यांतले लोक शहाणपणें करण्यांत अनावळे[10] लोकांवर नंबर मिळवतां ! तुम्ही असं करा, परळला डॉक्टर यमाजी भास्कर राहातात. त्यांच्याकडून तुमची थुंकी तपासून घ्या. तुमच्या खोकल्यावरून रोगाचं बीज घशांत आहे असं मला वाटतं. थुंकी तपासण्याची फी पंचवीस रुपये आहे. घाबरूं नको. माझी चिठी घेऊन जा. एटले[11] ते वीस रुपयामधे तुमचं काम करतील. थुंकीचा रिपोर्ट घेऊन या म्हणजे मला तुमच्या टी. बी. विषये बराबर निर्णय सांगतां येईल. '—डॉक्टर म्हणाले.

'अरे बाप रे ! थुंकी तपासायचे वीस रुपये ! ह्या त्याज्य पदार्थाच्या तपासणीला इतकी किंमत पडूं लागली आं ! '—गुंड्याभाऊ उद्‌गारला.

'हे थुंकीचं महत्त्व नसतां तुमच्या जिंदगीचं आहे. अहो, जिवाकरिता (पेक्षा) वीस रुपये काय फार आहेत ? '—डॉक्टर बोलले.

आम्हीं आपसांत विचार करून गुंड्याभाऊची थुंकी तपासून घेण्याचें ठरविलें. परंतु ह्या कार्याकरिता लागणारे वीस रुपये कोठून आणायचे ? आम्ही चि. सौ. चिमूताईचे यजमान रा. आत्मारामपंत यांजकडे पैसे उसने मागितले; पण त्यांच्याजवळ वीस रुपये काय, पण वीस दुगाण्यादेखील शिल्लक नव्हत्या ! मात्र त्यानी सुचविलें, 'गुंड्याभाऊ, तुम्हीं आपल्या आत्याबाईच्या पाटल्या मजजवळ दिल्या आहेत, त्या सराफाकडे गहाण टाकून वीस रुपये उसने देववतों. '

आत्मारामपंताच्या सूचनेवरून पाटल्या गहाण ठेवून वीस रुपये घेऊन आम्ही अमीर निवासपाशीं परत आलों. चार जिने चढल्याशिवाय वर खोलींत पोचायचें कसें, हा प्रश्न आमच्यापुढे उभा राहिला. कारण जिने चढण्याचे श्रम करूं नका, असें डॉक्टरनी बजावलें होतें. सुदैवानें जिन्याच्या पायथ्याशीं दोन पाटीवाले मजुरी करून खालीं उतरत होते. त्यांच्याशीं ठराव करून आठ आणे मजुरी देऊन गुड्याभाऊचें बंगाली अडीच मणांचें ओझें आमच्या खोलींत नेऊन सोडलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं थुंकी तपासण्यासाठीं आम्ही दोघे परळास डॉ. यमाजी भास्कर, डी. पी. एच्. (विगॅम), थुंकी आणि खाकरे यांचे निष्णात, यांच्या दवाखान्यांत गेलों. आंत शिरताच एक मोठें दालन लागलें. त्यांत वीसबावीस स्त्री-पुरुष डॉक्टरांच्या बोलावण्याची वाट पाहात होते. जाऊन तेथे बसल्यावर थोड्याच वेळांत एका पट्टेवाल्याने येऊन मला कानात सांगितलें, 'त्या खिडकीशीं जाऊन नंबर घ्या, मिस्टर.' दालनाच्या एका कोपऱ्यांत सिनेमा-गृहांतील तिकीटविक्रीच्या खिडकीसारखी एक खिडकी होती. तींत नट्टूनथट्टून बसलेल्या मनुष्याजवळ मीं नंबर मागितला. नंबरचा बिल्ला पुढे करून तो मनुष्य म्हणाला, ' पांच रुपये, प्लीज ! '

' कशाचे रे, बाबा ? '–मीं विचारलें.

' अर्थात् नंबराचे नंबर असल्याशिवाय डॉक्टरसाहेबांच्या चेंबरमध्ये कुणाला प्रवेश मिळत नाही.'

' घेशील नंबर तर भेटेल चेंबर '–असें काव्य रचीत मी पाच रुपये देऊन त्याच्याकडून नंबर घेतला आणि गुड्याभाऊजवळ बसून मेजावर पडलेलें वर्तमानपत्र वाचूं लागलों. चेंबरच्या दाराशीं पट्टेवाला उभा होता. आत गेलेले रोगी बाहेर येताच पुढला नंबर तो पुकारीत असे. दीड-दोन तास मार्गप्रतीक्षा केल्यावर आमचा नंबर लागला. आम्ही आंत जाऊं लागलों तेव्हा पट्टेवाल्याने नंबर परत मागितला.

' तुझ्या बापाने ठेवला आहे नंबर ! नगद पांच रुपये देऊन विकत घेतला आहे मी ! '–असें ठासून उत्तर देऊन आम्ही आंत शिरलों.

डॉक्टरसाहेबांचा भव्य काळाभोर देह आणि उग्र चर्या पाहून त्यांचें यमाजी भास्कर हें नांव सार्थ आहे असें आम्हांला वाटलें.

'डॉक्टर त्रिवेदींनी ही चिठी दिली आहे'—मी.

'बसा पाहूं ह्या खुर्चीवर.'—रोग्याच्या खुर्चीकडे निर्देश करून ते मला म्हणाले. पण मी रोगी नसून माझा मल्लसोबती तसा असल्याचें मीं त्यांना सांगितलें.

'स्वरूपं फसवीं असतात! तुम्ही बसा वस्ताद! प्रत्यक्ष भीमसेन झाला तरी त्याला राजवैद्याची आवश्यकता होतीच!'—त्यानी उद्गार काढले. नंतर त्यास म्हटलें, 'तुम्ही जरी बाह्यतः सशक्त असलां तरी रोगाचे जंतु घरभेद्या फितुराप्रमाणे तुमचं शरीर ढासळून पाडीत असतात. मी तुमच्या थुंकीचं पृथक्करण करून रिपोर्ट देतोंच. पण थुंकीत जंतु नसले तर ते शरीरांत नसतात, असं नाही.'

"दोन नकारांचा छेद जातो. 'असतातच, असं आहे' असं का नाही म्हणत?"—मीं विचारलें.

'ही शास्त्रीय प्रयोगशाळा आहे, कॉलेजांतली वादशाळा नाही.'—असें रागाने मला दाबून ते म्हणाले, 'ही निगेटिव्ह परीक्षा[१३] आहे. तुम्ही केवळ हिच्यावर अवलंबून न राहाता गुरुकुल हॉस्पिटलमध्ये प्रो. रुधिरप्रिय आहेत त्यांच्याकडून रक्त तपासून घ्या. म्हणजे तुमच्या रक्तात जर्तुविरोधी तत्त्व निर्माण झालं आहे कीं नाही, तें ते सागतील. त्यांची फी काही फार नाही. फक्त पधरा रुपये आहे. पण माझी चिठी घेऊन जा, म्हणजे साडेबारा रुपयांतच तुमचं काम होईल.'

हा नवीन खर्चाचा आकडा ऐकून गुंड्याभाऊचा चेहरा क्षणभर फिका पडला. डॉक्टरांनी त्यास बाजूला नेऊन त्याची थुंकी घेतली व दुसऱ्या दिवशीं येऊन बाकीचे पंधरा रुपये भरून रिपोर्ट घेऊन जाण्यास सांगितलें.

दुपारीं सराफाकडे जाऊन आणखी साडेबारा रुपये उसने घेतले. पुण्याला पत्रें लिहिलीं आणि आम्ही चौपाटीवर गुरुकुल हॉस्पिटलमध्ये गेलों. शिपायाने आम्हांला एकदम प्रयोगशाळेंत प्रोफेसरांच्याकडे नेलें. त्याच्यापुढे

साडेबारा रुपये ठेवून गुंड्याभाऊ म्हणाला, 'प्रोफेसरसाहेब, डॉक्टर यमाजी भास्करांनी ही चिठी दिली आहे.'

'आणखी हे साडेबारा रुपये आमच्या हॉस्पिटलच्या मदतीकरिता पाठवले आहेत, नाही का? फारच दयाळु आहेत यमाजी भास्कर! जरा बसा. तडकाफडकी रक्त तपासून दहा मिनिटात रिपोर्ट लिहून देतों.'—असें म्हणून प्रोफेसरांनी गुंड्याभाऊच्या दडातील रक्ताचे दोन थेंब काढून ते काचेला लावून ती काच सूक्ष्मदर्शकांत ठेवली. काचेचें निरीक्षण करतां करतां आनंदानं टाळया वाजवून ते ओरडले, 'पोरानो, इकडे या. धावा.'

त्याची हाक ऐकताच पलीकडील दालनांतून पांढरीं मळवस्त्रें पेहरलेले चारपाच विद्यार्थी आणि विद्यार्थिनी तेथे 'काय सर?' असें ओरडत धावत आल्या. 'पोरांनो, आज हा फारच चांगला नमुना मिळाला आहे ताज्या रक्ताचा. इतकं चागलं, निरोगी, दाट आणि सर्व जीवनसत्त्व समप्रमाणात असणारं रक्त मीं जन्मांत पाहिलं नव्हतं! तुम्हींहि त्या रक्ताचं पृथक्करण करून पाहा.'—त्यांनी विद्यार्थ्यांना सांगितलें.

'अवश्य, अवश्य! अशी संधि क्वचितच येते!'—असें उद्गारून सर्वांनी गुंड्याभाऊला गराडा दिला; आणि तो ओरडत असता प्रत्येकानें त्याच्या शरीरातील रक्ताचे दहादहा थेंब काढले. प्रोफेसरसाहेब खुश होऊन म्हणाले, "हा घ्या माझा रिपोर्ट. तुमच्या रक्तात कोणताहि दोष नाही. गंगाजलाप्रमाणे तें पवित्र आहे. अर्थात् तुमची विकृति आतल्या इंद्रियांत कुठं तरी असली पाहिजे. मी काही डॉक्टर नाही. पण मला वाटतं तुम्ही 'क्ष' किरणांनी आपल्या आतड्याचा फोटो काढून घेतला तर रोगाचा बरोबर पत्ता लागेल 'क्ष' किरणांचा फोटो म्हणजे यमाच्या राज्यांतलं गुप्त पोलिस खातंच आहे म्हणा ना! लपून बसलेलं रोगबीज हटकून पकडतो 'क्ष' किरणाचा फोटो!"

'तुमच्या हॉस्पिटलमध्यें व्यवस्था आहे का त्याची?'—मीं विचारलें.

"आमच्याकडे 'क्ष' किरणांचं साहित्य नाही; पण कोटामधे उदवाडा नर्सिंग होम आहे, तिथ तें आहे तिथले किरणनिष्णात डॉक्टर बरजोरजी फोटोग्राफर फार चांगले आहेत. 'क्ष' किरणाला तीस रुपये आकार

पडतो; पण माझ्या नांवाचं कार्ड घेऊन जा म्हणजे पंचवीस रुपयांत काम होईल. असे डोळे पांढरे करूं नका. ''–प्रो. रुधिरप्रिय गुंड्याभाऊच्या तोंडाकडे पाहून म्हणाले.

'डोळे पांढरे करूं नका, तर काय कायमचे मिटवून टाकूं ? अहो प्रोफेसरसाहेब, ह्या माझ्या मित्राच्या लग्नात आम्हीं सगळ्या नातेवाइकांचा वीस माणसांचा फोटो साडेचार रुपयात काढवला. पोपट, कुत्रा आणि म्हैस यांच्यासकट ! आणखी नुसत्या फुफ्फुसाच्या फोटोला पंचवीस रुपये ! हा अंदाज ऐकून डोळे पांढरे होतील नाही तर काय ? '–गुंड्याभाऊ म्हणाला

" नुसते साधे फोटो काढणं आणि ' क्ष ' किरणाचे फोटो काढणं यात फार अंतर आहे, रावसाहेब ! ' क्ष ' किरण तुमच्या अंगरख्याच्या आत, सदऱ्याच्या आंत, कातडीच्या आंत, शिरून तुमच्या फुफ्फुसांचा, काळजाचा अन् आतड्याचा फोटो उमटवितात. कुठं कांही बिघाड असेल तर तो ताबडतोब समजतो. ''—प्रो. रुधिरप्रिय.

कोटि करण्याची अनावर लालसा होऊन मीं विचारलें, ' काळीज उलटं असलं तर तेंहि समजत असेल ' क्ष ' किरणानीं ? '

माझ्या बोलण्याकडे लक्ष न देतां प्रोफेसर पुढे म्हणाले, '' पोटात सुई, टाचणी, चवली, पावली गिळली गेली असली तरी ती ' क्ष ' किरणाच्या फोटोंत ताबडतोब स्पष्ट दिसते. ''

''तर मग आमच्या म्युनिसिपालिटीचे जकात-इन्स्पेक्टर खवखवे म्हणून होते त्यांना पैसे खाण्याची फार सवय होती; त्यांनी खाल्लेले पैसेदेखील ' क्ष ' किरणांनीच उघडकीस आले असतील ? ''–गुंड्याभाऊने शंका प्रदर्शित केली.

' शक्य आहे. बरं आहे, आता वेळ न घालवतां तुम्ही उदवाडा हॉस्पिटलमध्ये जा. आम्ही आपल्या उद्योगाला लागतों. जय दयानंद ! ' – असें म्हणून प्रोफेसरांनी आम्हांला रजा दिली.

अंगांतून गेलेलें पळीभर रक्त व त्याचबरोबर धन्वंतऱ्यांनी चालविलेल्या रक्तशोषणाची चिंता, यायोगें गुंड्याभाऊ एका दिवसांत अर्धा

उरला. रात्रीं अमीर निवासांतील पाहुणेबंधूंनी आमच्याकडे पाहून ' या लोकांनी चांगलीच जिवाची मुंबई चालवली आहे !' असे उद्गार काढले. पण आमच्या जिवाची मुंबई होत होती का सोनापूर[१४] ... तें आमचें आम्हालाच माहीत !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्ही आत्मारामपंतांकडे गेलों आणि त्यांना ह्या ' क्ष ' किरणांच्या नवीन झेंगटाची माहिती दिली. ते म्हणाले, ' इतका खर्च करून टी. बी. आहे कीं नाही हेंच सिद्ध होणार. उपाययोजना, तर त्यानंतर ! ह्यापेक्षा टी. बी. आहेच असं गृहीत धरून औषधयोजना केलेली बरी नाही का ?' आत्मारामपंतांची ही कल्पना आम्हाला पसंत पडली. आम्ही डॉ. त्रिवेदी यांच्यासमोर ताबडतोब ती मांडली. तेव्हा ते म्हणाले, ' छे छे; तें सशास्त्र होणार नाही. समजा तुम्हांला क्षय झालेला नसून क्षयाची ट्रीटमेण्ट दिली तर आमच्या वैद्यकीय धंद्याला नामुष्की आणणारी वस्तु आम्हीं केली असं होईल. आपल्या जिंदगी ( आयुष्या- ) करिता दीडदोनशे रुपये काय अधिक आहेत ? तुम्ही लोक लग्नात जमाई रुसला की शेदोनशे रुपयावर सहज फुंकर मारता; पण डॉक्टर लोकांनी औषधाच्या सद्दा आण्याचे आठ आणे केले, नाही तर व्हिजिट फीच्या दोन रुपयाचे तीन रुपये केले, की मोठमोठ्यानं बोंब पाडतां !'

पुन्हा एकदा सराफाकडून पंचवीस रुपये उसने काढले. आठ तोळ्यांच्या पाटल्या त्याच्याकडे गहाण टाकलेल्या असल्याने त्या वेळच्या भावाप्रमाणे दोनशे रुपयापर्यंत उसनी रक्कम मिळण्यास काहीच अडचण नव्हती. रुपये घेऊन आम्ही उदवाडा नर्सिंग होममध्ये गेलों. फोटो घेतला. संध्याकाळीं तो परिपक्व करून देतों असें किरणशास्त्रज्ञ डॉ. फोटोग्राफरनी सांगितलें. संध्याकाळीं परिपक्व प्रत त्यानी आम्हाला दाखविण्यास भिंतीला टांगली व म्हटलें, " हें बघा मिस्टर तुमचं फुप्फुस. तुमचे डॉक्टर त्रिवेदी काय तो निकाल देतीलच. पण मी थोडी नॉन्‌ऑफीशियल[१५] बात सांगतों. तुमच्या फुप्फुसांमधी काही बी दरद दिसत नाय. पण बहुतकरून तुमचे दात बिघडलेले असेल. पाहूं. जरा ' आ ' करा ! "

गुंड्याभाऊने ' आ ' केला. त्याच्या दातावर टिचक्या मारून आणि

त्याला ओरडायला लावून डॉक्टर व्यथित अंतःकरणाने म्हणाले, ' तुमचं शरीर हर्क्युलसप्रमाणं[१] ' मजबूत आहे. फुप्फुस कोऱ्या टाचणीसारखं निर्मळ आहे; पण तुमच्या दाताला पायोरियाची बाधा झाल्यासारखी दिसते. त्यांतल्या त्यांत उजव्या बाजूचे खालचे सात अने आठ नंबरचे दात फार खराब झालेले दिसतात. पण मी दुसऱ्याच्या क्षेत्रावर कशाला आक्रमण करूं ! तुम्हीं इतके पैसे खर्च केले आहेतच, ते आणखी केवळ दहा रुपये खर्चून प्रिन्सेस स्ट्रीटवर त्रेकोडेण्टो दंतवैद्य आहेत त्याच्याकडे जाऊन दात तपासून घ्या. धोंडी, साहेबाचा फोटो नीट पॅकिंग करून दे. माझी फी तीस रुपये आहे; पण प्रोफेसरसाहेबाच्या शब्दाला मान देऊन पचवीसचा स्वीकार करतों. साहेबजी ! '

दुसऱ्या दिवशीं आणखी रुपये उसनवार काढून अमेरिकेंतून दंत-वैद्यकाचा अभ्यास करून आलेले निष्णात डॉ. त्रेकोडेन्टो यांच्या दवाखा-न्यात गेलों. तेथेंहि रोग्यांची बरीच गर्दी दिसत होती. कित्येक वृद्ध स्त्री-पुरुष रोगी दात बसवून घेण्यास, मध्यम वयाचे दुखरे दात उपटून घेण्यास, व आठ वर्षांचीं मुलें दुधाचे दात पाडून घेण्यास आलीं होतीं. परतु दोन तीन तरुणतरुणी शाबूत असलेले दात पाडून घेण्यास आल्या होत्या हें पाहून मला गमत वाटली. त्यातला एक म्हणाला, ' मी अभिनयकुशल नट आहें. म्हाताऱ्याचं काम करतांना माझे दात प्रेक्षकांना दिसून सोंगांत उणीव येते. त्याचप्रमाणं बदमाशाचं काम करतांना मधले मधले दात पडलेले दाखवावे लागतात, तसे माझे नसल्यानं बदमाषाचं काम साधत नाही. म्हणून मी सगळेच दात काढून घेऊन निरनिराळ्या आकाराच्या, संख्येच्या आणि रंगांच्या दातांच्या चौकटी करवून घेणार आहें. जसं सोंग तशी चौकट !'

' अन् जेव्हा सोंग नसून खरे अभिनयपटु लोकांना पाहायचे असतील तेव्हा मात्र तोंडाचं बोळकं पाहायची वेळ पाहाणारांना येईल !'—मी म्हणालों.

एक तरुणी दिसायला फार चांगली होती, तिचे मधले दात ओठाच्या बाहेर डोकावून पाहात होते, त्यामुळे तिचें लग्न जमण्यास अडचण येत होती. ती आपल्या आईबरोबर ते चोंबडे सौंदर्यचोर घालवून देण्यास तेथे

आली होती. भोळया आईने मुलगी दावीत असतां हें रहस्य आम्हां सर्वांस सांगितलें.

शस्त्रक्रियेच्या खोलींतून ' धावरूं नका, दुखवीत नाहीं ' अशा प्रकारचे आवाज, नंतर दोनतीन मोठ्या किंचाळया, कांही वेळ थुंकण्याचे आवाज आणि शेवटीं रुपयांचा छणछणाट होऊन एकेक रोगी बलिदानांतून निसटलेल्या बोकडासारखा चेहरा घेऊन बाहेर येई आणि दंतवैद्य पुढल्या रोग्यास आत बोलावी. इतर ठिकाणीं लागलेल्या रांगात आपला नंबर वर यावा म्हणून रांगकऱ्यांची धडपड चालते; पण येथे वरती नंबर लागला, की खालीं पळून जाण्याची सर्वांची उत्सुकता दिसत होती. गुंड्याभाऊच्या अगोदरचा रोगी शस्त्र-क्रियागारात जाऊन पुढील पाळी त्याची येणार तोंच तो पटकन् उठला आणि शेवटल्या नंबरला जाऊन बसला. पण डॉक्टराना हा अनुभव नवीन नव्हता. त्यानी बोलावण्याचा क्रम फिरवून एकदम गुंड्याभाऊसच पाचारण केलें. त्याचीं पावलें जड झाल्याने त्याला ढकलीत ढकलीत मी डॉक्टराच्या खोलींत नेलें. आम्हाला पाहातांच डॉक्टरांस मीच रोगी आहें असें वाटलें. त्यांनी मला दंतरोग्यांच्या विविध घटनायुक्त खुर्चीवर बळजबरीने बसविलें. मी ओरडू लागलों--' मी रोगी नाही, हा माझा मित्र रोगी आहे, त्याचे दात खराब झाले आहेत ! '

गुंड्याभाऊने मजकडे डोळे मिचकावीत हसत पाहिलें, खिशांतून चिठी काढिली आणि म्हटलें, ' डॉक्टर, ह्या माझ्या मित्राचे उजव्या बाजूचे खालचे सात, आठ आणि नऊ नंबरचे दात किडले आहेत. डॉ. फोटो-ग्राफरनी ही चिठी दिली आहे पाहा ! '

डॉक्टरांच्या मदतनिसाने माझ्या अंगावर केशकर्तनालयांत न्हावी लोक टाकतात तसलें मळवस्त्र टाकलें आणि माझ्या निषेधाला न जुमानता शस्त्रक्रियेची तयारी चालविली. डॉक्टरांनी चिठी वाचून म्हटलें, " ह्यात नऊ नंबरचा दात दिला नाही. पण तुम्ही म्हणतां म्हणून तोहि काढून टाकतों. अहो, ' मी नाहीं, मी नाही ' काय चालवलं आहे ? आमच्याकडे येणारे सगळे रोगी असाच बकवा करीत असतात. हें ॲनिस्थेटिक (बधिरत्वकारक ) इंजेक्शन दिलं, की दात काढतांना मुळीच तुम्हापत होणार नाही. सेफ्टी



“ अहो, हें काय चालवलं आहे तुम्हीं ! मला काहीं झालं नाही.
उगाच कां माझे चांगले दांत — —” ! ! !

वस्तऱ्यानं आपण दाढी करवतों आहों असं तुम्हाला वाटेल. दॅट्स राइट ! आता हें ईथरचं मिश्रण फवाऱ्याने उडवतों. अगदी हिमालयात हिमक्रीडा करीत आहों असं तुम्हांला वाटेल—–’

‘अहो, हें काय चालवलं आहे तुम्हीं ? मला कांही झालं नाही.

उगाच कां माझे चांगले दात—' असे माझे शब्द गुंड्याभाऊ आणि डॉक्टरांचा मदतनीस ह्यांनी आपल्या दांडगाईने दाबून टाकले. एकामागून एक असे माझे तीन सोन्यासारखे दात मी गमावून बसलों ! गुंड्याभाऊ निर्लज्जासारखा दात काढून हसत होता; पण डॉक्टरांचे पुढील शब्द ऐकतांच तो गंभीर झाला--'दात तपासण्याचे दहा रुपये, इंजेक्शनचे दोन, ईथरमिश्रणाचा एक, तीन दात उपटण्याचे सहा, मिळून एकोणीस रुपये झाले. दंतवैद्य उधारी हिशेब ठेवीत नाहीत. आमच्या या मदतनिसाजवळ द्या. बाकी दाताला कांही रोगबीग झालेला नाही हें पाहून आनंद वाटतो. सलाम !'

संध्याकाळीं आम्ही दोघे निष्णातांचे रिपोर्ट बगलेंत मारून डॉक्टर त्रिवेदींकडे आलों. त्यानी विचारलें, 'कमा काय साहेब ? तुम्हीं आणलेत रिपोर्ट ? आता ते नीट वाचून पाहून मिस्टर दाडेकरांना टी. बी. झाला आहे कीं नाही तें मी ठरवतों. अरे पण मि. जोग, तुम्ही तोंडाला लुगडं बांधून कां आले ?'

मीं त्रेकोडिण्टो दंतवैद्याकडे गुंड्याभाऊने मजवर केलेल्या पुंडाईची हकीकत त्यांना सांगितली. तेव्हा ते बराच वेळ हसून मला म्हणाले, 'अहो बत्तीस दात परमेश्वरानं माणसाला दिलेले आहेत; त्यांतले तीन गेले तरी खाण्यापिण्याला कांहीं अडचण पडणार नाही.'

"हा थुंकीचा, हा रक्ताचा, हा 'क्ष' किरणाच्या फोटोचा, आणखी हा कसला तरी रिपोर्ट घ्या अन् ठरवा मला क्षयबीय झाला आहे कीं काय तें !"-गुंड्याभाऊ रडक्या आवाजात म्हणाला.

'आता ह्या सगळ्या रिपोर्टांची तुलना करून रोगाचं निदान करणं मेहनत अने वेळ यांचा खर्च करायला लावणारं आहे. अशा सगळ्या परीक्षेची फी मी तीस रुपये घेतों. पण तुम्ही बाहेरगावचे आणि मध्यम वर्गातले आहेत, म्हणून तुमच्याकडून मात्र पचवीस रुपये घेईन. तुमच्या पांच रुपयानीं आमचा 'बेंक बॅलन्स' फारसा कमी होणार नाही. आमचा नाम तुमच्या गावात सगळ्यांना सांगा. कागद इथं ठेवून जा, अने काल सकाळीं आठ वाजतां या फी घेऊन'—डॉ. त्रिवेदी.

आतापर्यंत निरानिराळ्या फिया आणि वाहनखर्च मिळून शंभर रुपये खर्च झाले होते, आठवडाभर मुंबईस राहावें लागल्याने अमीर निवासाचे तीस चढले होते, आणि हे पंचवीस द्यावयाचे होते. आम्हांला अधिक काळ मुंबईत राहावें लागल्याने परतीच्या तिकिटाची मुदत संपली होती म्हणून भाड्यालाहि पैसे हवे होते. या कारणांनी आम्ही सराफाला पाटल्या विकून टाकल्या व पाऊणशे रुपये घेऊन निघालों. पुण्यास परत गेल्यावर पाटल्यांबद्दल काय जाब द्यावा याची गुंड्याभाऊला घोर चिंता पडली होती.

ठरल्या वेळीं आम्ही डॉ त्रिवेदींकडे गेलों, त्याच्यापुढे पंचवीस रुपये ठेवले आणि गुंड्याभाऊच्या रोगाचें निदान विचारलें. आधी पचवीस रुपये खिशांत टाकून व त्याच्या सुरक्षिततेबद्दल खात्री करून घेऊन डॉक्टर आनंद प्रदर्शित करीत म्हणाले, 'हात मिळवा रावसाहेब! आनंद--आनंद! सत्यं शिवं सुंदरम्! मी तुमचं दिलभर अभिनंदन करतों.' असें म्हणत त्यानी आम्हा दोघाशीं एकेका हाताने हस्तादोलन केलें.

'कां हो, अभिनंदन कसलं? क्षयान मी मरणार म्हणून कीं काय?' — गुंड्याभाऊने विचारलें.

'म्हणून नाही हो. तुम्हांला क्षयबीय काहीच झाला नाही, अने होण्याचा संभव पण नाही. तुमच रक्त तान्ह्या बाळाच्या रक्तासारखं ताजं आहे. तुमच्या थुंकींत कफाचा लेश नाही; पण तमाखू जरा कमी खात जा, म्हणजे थुंकींतून रक्त आल्यासारखं कुणाला वाटणार नाही. तुमच्या फुप्फुसांच्या फोटोंत कांही खामी दिसत नाही. तुमची नाडी पुष्कळ चांगली आहे. थोडक्यांत, तुमच्यासारखा निरोगी माणूस आख्या मुंबईत सापडायचा नाही. अने हें सगळं शास्त्रीय दृष्टीन सिद्ध झालेलं आहे. म्हणून तुमचं अभिनंदन करावं तितक थोडच आहे.'—डॉ. त्रिवेदी गुंड्याभाऊच्या पाठीवर थाप मारीत म्हणाले.

'अहो डॉक्टरसाहेब, ह्या अभिनंदनाला पात्र व्हायला जवळजवळ दोनशे रुपये खर्च झाला माझा! आणखी तोहि फुकटंफाकटी! यापेक्षा खरोखरच मला टी. बी. झाला असता, तर इतके पैसे फुकट घालवण्याचा मूर्खपणा तरी पदरांत पडला नसता! आता वडिलांनी दिलेल्या आठ

तोळे वजनाच्या पाटल्यांची काय वासलात लावली म्हणून सांगूं ? ' — गुंड्याभाऊ.

' तुझे रुपये गेले आणि माझे मजबूत तीन दात गेले – डॉक्टर लोकांच्या या करामतीमुळं आणखी तुझ्या लुच्चेगिरीमुळं ! दात पडण्याचं एखाद भलतंसलतं कारण गुलाब दिघेबाईंनी आमच्या हिच्या मनांत भरवून दिलं नाही म्हणजे मिळवलं ! तरी बरं, दात पाडायचे पैसे तूंच दिले आहेस ! '—मी.

आता तुम्हांला मी थोडक्यांत युक्ति सांगतों—' डॉक्टरानी सुचविलें, ' पाटल्या चोरांनी हिसकावून घेतल्या अन चोरांशीं मारामारी करतांना ह्या बारीक साहेबांचे दात पडले असं घरीं सांगून द्या. कुणाला हें खोटं आहे अशी शंका यायची नाही.'

' खरच आहे की तें ! चोरानी किंवा चोराच्या टोळीनं गुंड्याभाऊच्या पाटल्या पळवल्या हें म्हणणं बिलकूल खोटं नाही. चल गुंड्याभाऊ, मुंबईत येऊन ठकवलें जाण्याचे अनेक मार्ग आहेत. त्यांतला हा एक आपल्यांला पाहायला मिळाला ! तुझे पैसे आणखी माझे दात खर्चून हा एक अनुभव आपल्यांला मिळाला. नमस्कार हो डॉक्टरसाहेब ! नमस्कार ! अगदी कोपरापासून साहेबजी असो तुम्हाला ! '—मी म्हणालों.

✦ ✦

## टीपा

(१) चिमूताई ही चिमणरावाची धाकटी बहीण. (२) वायाळ – ज्यांत वायु विरघळले आहेत अशी, एरेटेड. (३) ' डॉक्टर ' ही पदवी कोणत्याहि विषयात विशेष प्रावीण्य मिळवून त्यात काही भर घालणाऱ्या विद्वानाला लावण्यांत येते. तो वैद्यकातच पारंगत हवा असे नाही. (४) तन्दुरुस्ती – शरीरप्रकृति. (५) ब्लड्प्रेशर – रक्तदाब. (६) मृत्यूने केस पकडल्या-

प्रमाणें. (७) टी. बी.–क्षय. (८) यमराजसहोदर – यमाचा भाऊ, वैद्य, डॉक्टर. "वैद्यराज नमस्तुभ्य यमराजसहोदर । यमस्तु हरति प्राणान् वैद्यः प्राणान् धनानि च ॥" या श्लोकात म्हटल्याप्रमाणे वैद्य पैसाच नव्हे तर यमाप्रमाणे प्राणहि घेतो. म्हणून तो यमराजसहोदर. (९) डहापण–शहाणपण. (१०) अनावळे–गुजराथेतील एक उच्च ब्राह्मण जात. (११) एटले–म्हणजे. (१२) चेवर–खोली. (१३) ज्या परीक्षेत अमुक रोग नाही एवढेच ठरते, पण कोणता रोग आहे ते ठरत नाही, ती निगेटिव्ह (नकारात्मक) परीक्षा होय. (१४) सोनापूर ही मुंबईतील स्मशानभूमि आहे. (१५) नॉन ऑफिशियल–खाजगी. (१६) हर्क्यूलिस हा भीमासारखा एक बलाढ्य पुरुष प्राचीन काळी युरोपात होऊन गेला. (१७) बँक बॅलन्स – बँकेतील शिल्लक. (१८) खामी – उणीव

## अभ्यास

(१) विनोदासाठी कोणता सामाजिक दोष या कथेत आधाराला घेतला आहे ?

(२) गुंड्याभाऊ व चिमणराव यांची जी फसवणूक झाली तीबद्दल त्या दोघांना तुम्ही कितपत जबाबदार धराल ? डॉक्टर लोकांना कितपत जबाबदार धराल ? जास्त जबाबदारी कोणावर टाकाल ?

(३) गुंड्याभाऊ व चिमणराव जीवाची मुंबई करण्यासाठी जातात; पण दोनशे रुपये व तीन दात गमावून बसतात ! हे प्रसंगनिष्ठ विनोदाचें एक उदाहरण होय. प्रा. रुधिरप्रिय आणि डॉ. ब्रेकोडेण्टो यांच्याकडे कोणते विनोदी प्रसंग उत्पन्न होतात ?

(४) गुंड्याभाऊ व चिमणराव यांच्यातील खादाडपणा, गावंढळपणा, विनोद करण्याची हौस व भोळसटपणा या गुणांची या कथेतील उदाहरणे शोधून काढा.

(५) पुढील वाक्यांमधील गर्भितार्थ तुमच्या लक्षांत आला का? नसल्यास ती पुन्हा पाहून त्यांवर विचार करा :– (अ) आम्ही.... त्रिवेदी डॉक्टरांच्या दवाखान्यांत जाऊन रिकाम्या बाकावर बसलो. (ब) म्हणूनच पुण्यातलं साधारण आयुर्मान मुंबईच्या माणसाच्या आयुर्मानापेक्षा दहा वर्षांनी अधिक असत (क) दात पडण्याचं एखाद भलतंसलतं कारण गुलाब दिघेबाईंनी आमच्या हिच्या मनात भरवून दिलं नाही म्हणजे मिळवलं! तरी बरं, दात पाडायचे पैसे तूच दिले आहेस! (ड) चोरांनी किंवा चोरांच्या टोळीनं गुंड्याभाऊच्या पाटल्या पळवल्या, हे म्हणणं बिलकूल खोटं नाही.

✦ ✦ ✦

# स्पष्टवक्तेपणाचे प्रयोग : ७ :

" सत्य हाच आमचा मित्र आहे. आम्ही कोणालाहि आपलं मन अगदी आडपडदा न ठेवतां स्पष्टपणाने सागणार. आजच्या माझ्या तरुण श्रोत्यांसदेखील माझा असा उपदेश आहे, की तुम्ही स्पष्टवक्ते व्हा. बोलण्यांत, चालण्यांत, करण्यांत आडपडदा ठेवूं नका. कदाचित् रूढीनं जखडलेले, नीतिमद्यानं[1] झिंगलेले सनातनी बुड्ढक तुमच्यावर रागावतील; परंतु समाजाच्या चिरकालीन हिताच्या दृष्टीने पाहातां स्पष्ट बोलणं, स्पष्ट लिहिणं आणि स्पष्ट वागणं, या गोष्टी फार परिणामकारक आहेत. सगळ्याच्या आधीं स्पष्ट विचार करायची मात्र शक्ति जागृत झाली पाहिजे. "—

व्याख्यातीचें म्हणणें मला सोळा आणे पटलें. गुळमुळीत बोलण्याने आणि वागण्याने आजपर्यंत माझें किती तरी वैयक्तिक नुकसान झालेलें होतें तें मला आठवलें. भिडस्त स्वभावामुळे मी माझ्यामागे अनेक लफडीं लावून घेतलीं होतीं. शेजारचे कुळकर्णी गावाला जात असतांना त्यांचा चावरा कुत्रा महिनाभर घरांत बाळगून मीं सगळ्या आळीच्या शिव्या खाल्लेल्या आहेत. घरातल्या गळक्या मोऱ्या, गळकें छप्पर आणि आटलेला नळ, यांच्याविरुद्ध घरमालकाकडे मीं कधींहि स्पष्ट तक्रार केली नाही. ऑफिसातली माझी चांगली खुर्ची एस. आय. आर. ऐय्यरने

बळकावली असतांदेखील भिडस्तपणामुळे मला ती परत मिळवितां आली नाही. कोणीं उसने पैसे मागितल्यास स्पष्ट नकार देतां न आल्याने किती तरी नाठाळ कुळांचा सावकार बनण्याची अनेक वेळां मजवर पाळी आलेली होती.

बाईंचें व्याख्यान संपतांच व्यासपीठावर चढून मी मनःपूर्वक त्यांची पाठ थोपटली. बाई कावऱ्याबावऱ्या झाल्या पण त्यांना धार देत मी



मी मनःपूर्वक त्यांची पाठ थोपटली.

म्हणालों, ' ताई, शाबास ! आज तुम्ही मला दिव्य संदेश दिला. माझ्या आयुष्याला तुम्हीं नवीन वळण लावलं.याच्यापूर्वीच तुमची माझी गाठ पडती तर...!'

माझ्या कृतीचा श्रोत्यांनी विपर्यास केला. त्यांना वाटलें, हा कांही तरी अतिप्रसंग करीत आहे. त्यामुळे अध्यक्ष, चिटणीस आणि स्वयंसेवक यांनी मजभोवती गराडा घालून आणि कुत्र्यांप्रमाणे भुंकून मला वेगें वेगें

सभास्थान सोडण्यास लाविलें. मला पळवून लावून त्यांनी माझ्याच कृतीचें अनुकरण केलें असलें पाहिजे अशी माझी खात्री आहे. प्रथम मी डॉ. मुंगळे यांच्या दवाखान्यांत शिरलों. माझा धाकटा मेहुणा शंकर काशीनाथ किडमिडे हा क्षयानें आजारी असून औषधोपचाराकरिता त्यास घरच्या मंडळींनी पुण्यास आणून ठेविलें होतें. त्यास मुंगळे डॉक्टरांचें औषध चालू असल्यानें सहजच चौकशीकरिता दवाखान्यात शिरलों व शंकरच्या प्रकृतीचा विषय काढून मीं विचारलें, ' काय डॉक्टर, शंकरच्या प्रकृतीबद्दल तुम्हांला कितपत आशा आहे ? '

' आम्ही क्षुद्र माणसं काय करणार ? कर्ताकरविता परमेश्वर आहे ! ' —उसासा टाकून डॉक्टर म्हणाले.

' डॉक्टर, असं गुळमुळीत बोलूं नका, स्पष्टपणानं आपलं मत काय असेल तें सांगून टाका. आताच मी कुमारी तरुणीबाईच्या व्याख्यानाला गेलों होतों. आपल्या समाजाला संदिग्ध, अर्धसत्य आणखी पडद्याआडून नरो वा कुंजरो वा पद्धतीचं[2] द्व्यर्थी बोलण्याची जी सवय लागली आहे तिचा त्यांनी खरपूस समाचार घेतला. तेव्हा काय तें स्पष्टपणानं सांगा. '

' बरं बुवा, स्पष्ट सांगतों. मात्र आपला धीर खचूं देऊं नका.' विडीचा झुरका घेऊन आणि मला एक विडी देत डॉक्टर म्हणाले, ' खरं सांगायचं म्हणजे शंकरच्या आयुष्याचे फार तर महिना दोन महिने आता उरले आहेत. '

माझ्या हातांतील विडी गळून पडली. हातरुमालानें डोळे पुशीत मी तत्काळ उठलों. स्पष्टोक्ति चांगली असली तरी कठोर असते अशी माझी खात्री झाली. रोज संध्याकाळीं किडमिड्यांच्या बिऱ्हाडीं जातांना एखादा संत्रा, कांहीं वासाचीं फुलें आणि एखाद्या गटारफुंक्या वर्तमानपत्राचा ताजा अंक मी विकत घेत असें. आज वासाच्या फुलांऐवजी पूजेचीं फुलें आणि गटारफुंक्या पत्राऐवजी मुमुक्षूचा[3] अंक मीं विकत घेतला. शंकरच्या बिछान्याजवळ जाऊन बसतांच त्यानें खोल गेलेल्या आवाजांत मला विचारिलें, " आप्पा, आणलात का ' निर्लज्ज ' पत्राचा ताजा अंक ? आज कोणाला शिव्या दिल्या आहेत त्यांत ? "

" बाळ शंकर, ' निर्लज्ज ' पत्र वाचण्याचं अजून तुझ्या मनांत यावं ह्यावरून स्वतःच्या परिस्थितीविषयी तूं किती अजाण आहेस ह्याची बरोबर कल्पना करतां येते. " मी गंभीर चेहरा करून म्हणालों, " आता चारगट पत्रं वाचण्याच तुझे दिवस राह्यले नाहीत. आज तुला वाचण्याकरिता हा ' मुमुक्षूचा ' अंक आणला आहे. साधुसंतांचीं वचनें आहेत ह्यांत. हा वाच आणि परमार्थचिंतन कर. "

शंकरच्या पायगतीं त्याचे वडील, माझे श्वशुर काकासाहेब, सहाणेवर कांही तरी उगाळीत बसले होते. माझें बोलणें त्यांना जरा विचित्र वाटलें व म्हणून ते किंचित् हसत म्हणाले, ' काय हा आप्पासाहेब, आज मेव्हण्याची यट्टा करण्याचा नवीन मार्ग तुम्हीं शोधून काढला आहे वाटतं ? बरं, असो. तुम्ही ती नवीन कादंबरी शंकरला वाचायला आणून देणार होता ना ? रोज वाचून दाखवा म्हणजे त्याची करमणूक होत जाईल. '

' काकासाहेब, ' वीररसप्रधान गद्य नाटकातील नायकाप्रमाणे हेल काढीत मी उद्गारलों, ' आता कसची कादंबरी अन् कसचं नाटक ! ह्या बिचाऱ्या शंकर किडमिड्याचं आयुष्य म्हणजे शोकान्त कादंबरीच होणार आहे. ह्याला कादंबरी वाचून दाखविण्याऐवजी गरुडपुराण किंवा महाभारतांतलं स्वर्गारोहणपर्व वाचून दाखवल तर बिचाऱ्याला परलोकात तरी त्यांचा काही उपयोग होईल ! '

माझे विचार ऐकून काकासाहेब अंगावर शहारे आल्यासारखें करीत होते आणि शंकरने तर डोक्यावरून पांघरूण घेतलें. हा त्याचा ढोंगीपणा मला आवडला नाही. ते दोघे भवितव्यतेशीं शहामृगाचा खेळ खेळत होते. या कमकुवतपणाबद्दल त्याची कानउघाडणी करण्यास मी तोंड उघडणार तोंच चिनीमातीच्या पेल्यात लापशी घेऊन काकूसाहेब तेथे आल्या. हातातील पेलावशी खाली ठेवून त्या शंकरला म्हणाल्या, ' ऊठ बाळ, थोडी खीर खा. आता तुला भूक लागू लागली आहे. नियमितपणानं औषधपाणी नि खाणंपिणं घेत गेलास, तर एका महिन्याच्या आत तूं खडखडीत बरा होशील. ( माझ्याकडे वळून—) नाही का हा, आप्पासाहेब ?'

हा जर मी तरुणीबाईचें व्याख्यान न ऐकलेला असतों तर एकदम 'होऽऽ' असा लांबलचक हेल काढून काकूबाईच्या बोलण्यास संमति देऊन टाकली असती. रोग्याला खोटें उत्तेजन देण्याचें पातक डोक्यावर घेतलें असतें; परंतु आता मी स्पष्टवक्तेपणाचें व्रत स्वीकारलें होतें. डॉक्टरांचे शब्द मला पक्के आठवत होते म्हणून मी म्हणालों, 'काकू, तुमची ही आशा व्यर्थ आहे.' माझ्या या विचित्र उत्तरामुळे काकू स्तिमित झाल्या. तिकडे काकाहि हातातलें कायसें उगाळण्याचें काम बंद ठेवून आश्चर्यानें पाहात राहिले होते. काकू काकुळतीस येऊन डोळ्यांत पाणी आणून म्हणाल्या, 'आप्पासाहेब, ही थट्टा करायची वेळ नव्हे, उगीच काही तरी बोलून रोग्याला घाबरवून सोडणं चागलं नव्हे.'

'मी तरी कुठे थट्टा करतों आहें? आताच डॉक्टर मुगळ्यानी सांगितलें.'—असें मी बोलत असता काकासाहेबानी अडथळा करून मला म्हटलें, 'तुम्हांला कुणी हाक मारतंय वाटतं. जरा दाराशीं जा पाहूं.'

मीं कानोसा घेतला व दरवाजापर्यंत जाऊन आलों. परंतु मला कोणींहि हाक मारली नव्हती. मला बोलताना थाबविण्याची काकासाहेबाची ही क्लृप्ति असावी असें माझ्या चटकन ध्यानात आलें. मी तसाच परत फिरून रोग्याच्या अंथरुणापाशी येऊन उभा राहिलों. काकासाहेबानी विषयान्तर करण्यासाठीं इकडल्या तिकडल्या गप्पा मारण्याचा घाट घातला; पण मी पुण्याचा माणूस सातारच्या या साध्याभोळ्या म्हाताऱ्यास काय दाद देणार? मूळ पदावर येऊन मीं म्हटलें, 'आपला काय बरं विषय चालला होता काकासाहेब?'

'विजेचे दिवे चांगले का घास्लेटचे?'

'छे! नव्हे.'

'मग कुलीन स्त्रियांनी नाटकांत काम करावं कीं नाही, हा असेल.'—काकासाहेब.

'छे, हा पण नव्हे.'—मी.

'मग हा आपला हा असल, खादीनं स्वराज्य मिळेल कीं नाही!'—काकासाहेब.

'तो नाहीं हो ! उगीच चाळवाचाळव कशाला करतां ? डॉ. मुंगळ्यांनी शंकरच्या प्रकृतीविषयी काय सांगितलं हा विषय चालला होता. '—नेट धरून मी म्हणालों.

' काय सांगितलं डॉक्टरनी ? मला तरी कळू द्या आप्पासाहेब, डॉक्टरनी काय सांगितलं तें ! '—रोग्याच्या पांघरुणांतून क्षीण आवाजांत शब्द उमटले. त्याला उत्तर देताना थोडीशी दुःखपूर्ण प्रस्तावना करून डॉ. मुंगळ्यांचा अभिप्राय मीं स्पष्टपणें शंकरला सांगितला : "बाळ शंकर, खरं सांगायचं म्हणजे तुझ्या आयुष्याचे फार तर महिना दोन महिने आता उरले आहेत."

तो ऐकताच शंकरने "अरे बाप रे ! असे उद्गार काढून डोक्यावरून पांघरूण घेतलें. काकासाहेबानी श्रीराम श्रीराम करीत शेजारच्या खुर्चीवर डोकें टेकिलें, आणि काकूबाई "अरे माझ्या बाळा !" असें ओरडत मुलाला मिठी मारून ओक्साबोक्शी रडू लागल्या. हा अनपेक्षित प्रकार पाहून मीं तेथून हळूच पाय काढिला.

घरीं आल्यावर कपडे काढून जेवावयास बसणार इतक्यात आमची मोलकरीण गजी तेथे आली आणि तिने मला सांगितलें, " बाईचं अवषद टेबलाच्या खनात ठिवलं आहे. " हें ऐकून आईने विचारलें, " कसलं ग औषध गजा ? " हा प्रश्न ऐकून गजा नुसतीच हसली; पण मीं स्पष्टवक्तेपणाचें कंकण बांधिलें असल्याने माझ्याने राहावेना. मी म्हणालों, ' अग, तें हें कोम्—'

' व्हय व्हय, कोंडयाची भाकरी आनली आहे बाईच्याकरता. ' –गजाने समयसूचकपणा दाखविला.

' मग ती करायला गजा कशाला पाहिजे ? मीं नसती का दिली करून ?'— आई.

सौभाग्यवती मला कांही न बोलण्याविषयी खुणा करीत होती. पण तिच्याकडे लक्ष न देतां मी म्हणालों, ' कोंडयाची भाकरी नव्हे, पण कोंबडीचं अंडं आहे. हिला अशक्तपणा भासायला लागल्यामुळं डॉक्टरनी रोज एक अंडं द्यायला सांगितलं आहे. '

आई खूपच संतापली आणि ओरडून म्हणाली, ' इश्श, हा पदार्थ अन् ब्राह्मणाच्या घरांत ! आम्ही काय कधी आजारी पडलों नाही का ? पण आम्हांला नाही कधी असल्या अभक्ष्य खाण्याची गरज वाटली. अशक्त होत असशील तर डिंकाचे लाडू खा; नाही तर बदामाच्या वड्या देईन चोवीस औषधं घालून ग्रहवैद्यकांत" सांगितलेलीं ! पण हें काय ? ब्राह्मणांनी खाऊं नये तें खायचं ? '

' अहो आईसाहेब, आप्पा तुमची थट्टा करत्यात जनू ! मी कशाला बामनाच्या घरांत इटाळ कालवूं ? कोंबडीच अंडं न्हवं पर कोंड्याचा लाडू आहे बघा ! '—गजा आईचें समाधान करण्यास्तव म्हणाली.

आमचें बोलणें चालू असतां कागदांत गुंडाळलेलें अंडें सौ.ने टेबलाच्या खणांतून काढिलें आणि तें पदराखालीं झाकीत ती स्वयंपाकघरांत जाऊं लागली. गजाच्या उत्तरानं आईच्या भोळसट अंतःकरणास वाटलेलें समाधान तिच्या चर्येवर दिसू लागलें होतें. पण हा अज्ञानमूलक आनंद तिने उपभोगावा हें मला बरोबर वाटलें नाही. मी सौ.च्या हातून तें अंडें हिसकावून घेतलें आणि आईची समक्ष खात्री केली. पुन्हा आईचा क्रोधाग्नि भडकला आणि बराच वेळ तिची सरबत्ती झडली. लग्नाच्या मिरवणुकींत डयांडची गर्जना थांबल्यावर जशी वाजंत्र्याची पिरपिर चालू होते त्याप्रमाणे आईची सरबत्ती बंद पडल्यावर सौ. ची पिरपिर चालू झाली. ती नुकतीच किडमिड्याच्या घरीं भावाच्या समाचाराला जाऊन आली होती आणि नुकताच तेथे मीं जो हलकल्लोळ माजवून दिला होता त्याबद्दल माझी कानउघाडणी करणें हा तिच्या व्याख्यानाचा विषय होता. तिचें बोलणें चालू असतां माझे मित्र नथूशेठ तेथे आले व त्यांनी आजची रात्र भजनाकरिता माझी पेटी मागितली.

पेटीसारखीं हत्यारें कोणीं दुसऱ्यास वापरायला देऊं नयेत असें माझें अनुभवसिद्ध मत भिडस्तपणामुळे मीं कोणाजवळ बोलून दाखविलें नव्हतें. कधी भाता फुटला आहे, तर कधी सूर बिघडले आहेत किंवा अमक्या—तमक्याने गायनाच्या बैठकीकरिता उसनी नेली आहे अशा थापा मारून

मी पेटी देण्याची टाळाटाळ करीत असें. यामुळे पेटी देण्याचें टाळूनदेखील कोणाचा राग संपादन केला नाही.

आज मात्र माझ्या अंगांत स्पष्टोक्ति संचारली होती. 'नथूशेट,' मी म्हणालों, 'आजपर्यंत अनेक थापा मारून तुम्हांला पेटी देण्याची मी टाळाटाळी करीत होतों.'

'अन् आज मात्र पेटी देणार असंच कीं नाही ?'–प्रफुल्लित चेहऱ्याने नथूशेठनीं विचारलें.

'नव्हे, नव्हे; आजसुद्धा पेटी देणार नाहीं. पण त्याबरोबर थापा मात्र देणार नाही. तुम्हाला एकदाच साफ सांगून टाकतों, कीं आज काय अन् पुढे काय, कधीहि मी आपली पेटी तुम्हांला देणार नाही. मग ती दुरुस्त असो कीं तिचे बारा वाजलेले असोत !'

हे माझे सडेतोड शब्द ऐकून नथूशेटचा आपल्या कानांवर विश्वास बसेना. माझ्यासारख्या भिडस्त माणसाच्या तोंडून हे निर्भीड शब्द निघणें म्हणजे केळीच्या पानाच्या पिपाणींतून तुतारीचा निनाद बाहेर पडण्यासारखें आश्चर्य होतें ! मीं कांही तरी नशा केला आहे अशी त्याची कल्पना झाली असावी.

याप्रमाणे माझ्या नवीन व्रताला प्रारंभ फारसा चांगला झाला नाही. पण अशीं व्रतें इतराच्या समाधानाकरिता नसून स्वतःच्या मनाच्या संतोषाकरिता पाळावयाचीं असतात याची जाणीव टिकल्याने मला झोप लागली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मला एक लग्न जुळविण्यास जावयाचें होतें. माझे मित्र सखारामपंत यांचा भाऊ बाळकराम याचें लग्न जमण्याचा योग होता. मुलगी अहमदनगरचे सराफ रा. शेंडे यांची होती. मुलीची पसंती झाली असून शेवटचें बोलणें बाकी होते. तें करण्याकरिता मी सखारामपंता-बरोबर शेंड्यांच्या बिऱ्हाडीं जाण्यास निघालों. बरोबर बाळकरामहि होता. औपचारिक प्रश्नोत्तरें झाल्यावर शेंड्यानीं बाळकरामाच्या बौधिक आणि सांपत्तिक स्थितीविषयी चौकशी करण्याकरिता पहिला प्रश्न टाकिला, 'आपलं शिक्षण कुठपर्यंत झालं आहे ?'

सखारामपंतांनी उत्तर दिलें, 'हे शिकलेले आहेत पण ग्रॅज्युएट नाहीत.' ह्या उत्तरावरून कोणाचाहि ग्रह झाला असता, की बाळकरामाच्या स्वारीने विद्यापीठाची मध्यम कक्षा ओलांडली असून तो पदवीधर होण्याचेंच बाकी उरलें होतें. परंतु बाळकरामाने विद्यापीठाचा उंबरठादेखील ओलांडला नव्हता, अशी मला माहिती होती. जरी लग्न जुळविण्यास नवरदेवाच्या बाजूनें मी गेलों होतों आणि 'उत्सवे व्यसने चैव विवाहे प्राणसंकटे' असत्य बोललें असता चालेल असा काहीसा श्लोक आहे, तरी त्यांतील उपदेशाचा भंग करून सत्य बोलण्याचा मी निर्धार केला. 'अहो शेटमहाराज, आमचे बाळकराम ग्रॅजुएट नाहीत इतकेंच नाही तर मॅट्रिक-देखील नाहीत!'—असें मी सांगितलें. नवरदेव आणि त्याचे बंधुराज ह्यांना आपल्याच गोटांतून आपल्यावर हा बॉंब अचानक येऊन पडेल असें वाटत नसल्यानें ते एकदम थंड पडले

'कांही हरकत नाही. आजकाल ग्रॅज्युएट होऊन तरी काय मिळताहेत दगडी? परवा आमच्या नगरास पन्नास रुपयांच्या जागेवर एका फर्स्ट क्लास एम. ए. ची नेमणूक झाली. बरं, तें असो; घरचं तरी ठीक आहे ना?'—शेटयांनी विचारलें.

सखारामपंत—'घर आहे'

'भाड्याचं.' मीं वाक्याची पूर्तता केली.

पुन्हा एकदा भावांची जोडी विजेचा धक्का बसल्याप्रमाणे चमकली शेटयांना किंचित् हसूं आलें आणि त्यांनी विचारिलें, 'बरं, परमेश्वरी नोटा असतील दहा—वीस हजारांच्या?'

सखारामपंतानी होकार दिला; पण मीं शेटयाचा गैरसमज न व्हावा म्हणून म्हटलें, 'आहेत, पण त्या यांनी आपल्या सावकारांना लिहून दिलेल्या आहेत.'

शेटयांनी बाळकरामाच्या वयाची चौकशी केली. सखारामपंतांनी माझ्या पाठीला चिमटा घेऊन आणि बाळकरामाने डोळे वटारून मला गप्प राहण्याची खूण केली. 'तेविसावं संपून चोविसावं लागलं गेल्या फाल्गुन शुद्ध पौर्णिमेला; होय कीं नाही रे बाळकराम?'—सखारामपंत.

' बरोबर आहे. ' बाळकरामाने समंति दिली.

ह्या लबाडीचा मला मनापासून राग आला. मी पंतांना रागाने विचारलें, ' वाहवा, सखारामपंत! वयाचीं वर्षे उलट्या क्रमानं केव्हापासून फिरू लागलीं? उगाच मोठे डोळे करून मला दटावायला पाहू नका. ह्याला नुकतंच सत्ताविसावं वर्ष होत. तें आता तीन वर्षांनी कमी कसं झालं? '

रा. शेंड्यांना हा गौप्यस्फोटाचा प्रकार पाहून बरीच गंमत वाटत होती. ते म्हणाले, ' अहो, इसवी सनापूर्वी ३२७ व्या वर्षी शिकंदराने हिंदुस्थाना-वर स्वारी केली, आणखी तो ३२३ व्या वर्षी मेला, हें कसं झाल? अगदी इतिहासाच्या पुस्तकात छापलेलं म्या वाचलं आहे. तसंच बाळक-रामाना तीन वर्षांपूर्वी सत्ताविसावं वर्ष होत तें आता चोविसावं झाल आहे. हाः हाः हाः !'

आता मात्र त्या दोन भावाना मानखंडना असह्य होऊन ते उठून गेले. मीहि त्याच्या मागोमाग जाऊन त्यास गाठलें व त्यांच्याबरोबर पावलें टाकण्याचा यत्न करू लागलों परंतु मला झिडकारून टाकून सखारामपंत म्हणाले, ' जोग, तूं इतका हलकट असशील असं मला वाटलं नव्हतं. '

' त्यांत हलकटपणा कसला? खरं आणि स्पष्ट बोलायचं असा मीं कालपासून निश्चय केला आहे. मग त्यात कोणाला भलं वाटो कीं बुरं वाटो; त्याची मला पर्वा नाही. '–मीं धीटपणाने त्यांस उत्तर दिलें.

' मग तुझ्याहि मैत्रीची आम्हाला काहीइतकी पर्वा नाही.' असें सांगून ते दोघे बंधु रस्ता फुटला तेव्हा मजपासून दूर झाले.

स्पष्टवक्तेपणास जगांत फारच थोड्याजवळ किंमत असते असें दिसून त्याबद्दल खेद करीत मी घराशीं पोचतों तोंच दाराशीं तांगा उभा असून त्यात, धोतरांत बांधलेलीं दोन गाठोडीं, एक फिरकीचा तांब्या आणि सुंभाने बांधलेली चोंगडीची वळकटी इतक्या जिनसा ठेविलेल्या दिसल्या. ' कोण पाहुणे आले आहेत बुवा? ' असें बोलत मी घरांत शिरलों तेव्हा चौघडी पांघरलेली आईची मूर्ति माझ्या नजरेस पडली. मला पाहातांच तिने सांगितलें कीं, ज्या घरात राजरोसपणें अशीं व्याळी जातात त्यात

इतःपर आपल्याला राहावयाचें नाहीं आणि आपण नाशिकास त्रिंबकमामाकडे राहावयास जात आहों.

मीं तिला समजुतीनें सांगितलें कीं, ज्या अंडीविक्याकडून मी अंडीं घेतों तो ब्राह्मण आहे. त्याचप्रमाणे ज्यांच्या घरीं अंडीं खातात अशा पांचसात ब्राह्मणांचीं नांवें तिला मीं सांगितलीं.

‘ मेल्या, पण ते लोक कांही ते पदार्थ आपल्या आयांच्यापुढे आणून आदळीत नसतील ! एका बाजूला जाऊन खात असले तर त्यांत काय दोष आहे ? दृष्टीआड सृष्टी ! ’

‘ एकंदरीत तुझी हरकत काय ती राजरोसपणालाच आहे ; गुप्तपणानें पाप केलं तर त्याला तूं दोष देत नाहींस. ’—मी म्हणालों.

आई संतापानें म्हणाली, ‘ राजरोस काय कमी पापं चालली आहेत ? सूनबाईची मैत्रीण ती गुलाब दिघे थेट चुलीपर्यंत येऊन वावरते, तिकडे नाहीं मी कानाडोळा करीत ? पण दिवसेंदिवस तुम्ही फारच वहावत चाललांत ! मी जात्यें निघून. आता खुशाल तुम्ही कोंबडीचींच काय पण गोमातेचींसुद्धा अंडीं खा. चल हाक रे. ’ हें शेवटचें वाक्य टांगेवाल्यास उद्देशून होतें.

आईचें आणि माझें हें पहिलेंच भांडण नव्हतें. सध्या घरांत अडचण येण्यासारखी नसल्यानें तिची घरीं मला अडगळच वाटत होती. ती अनायासें माहेरीं जाण्यास तयार झाली, हा माझ्या नवीन मताचा फायदा झाला असें मला वाटलें.

आमच्या सुपरवायझरांपैकी एक मि. टर्नबुल यांची शिकंदराबादेस बदली होणार असल्यानें दुपारीं चार वाजता त्यांना ऑफिस—स्टाफतर्फे पान-सुपारी होती. आमच्या ऑफिसांतील चांगल्या वक्त्यांत माझी गणना होत होती. कारण वक्तृत्वकलेवरील एका इंग्रजी पुस्तकांतून मीं काहीं भाषणें पाठ केलेलीं होतीं. नवीन अधिकाऱ्याची नेमणूक, जुन्या अधिकाऱ्याची बदली, कारकुनांपैकी कोणास मिळालेली बढती, साहेबवर्गांत झालेले अपत्यजन्म, विवाह यासारखे मंगल प्रसंग आणि मडमाचे मृत्यु यांपैकी कोणताहि विषय येवो, माझी जीभ शर्यतीच्या घोडीप्रमाणे वळवळत असे.

आज मात्र मीं रा. देशपांडे यांस बजावलें, की मजकडे भाषणाचें काम देऊं नका; मीं स्पष्टवक्तेपणाची शपथ घेतली आहे; आज मी भाटासारखा स्तुतिपाठ करणार नाही. परतु त्यांनी माझें न ऐकतां मला बोलण्यास भाग पाडलें आणि त्यामुळे पाण्यांत टाकलेल्या ढेकळाप्रमाणे जिरून जाण्याची पाळी सर्वांवर आली, त्यांत माझा काय दोष ? दोघातिघांचीं भाटवजा स्तुतिपूर्ण भाषणें ऐकल्यावर साहेबांच्या आणि कारकूनबांधवांच्या अत्याग्रहामुळे— अगदी ढकलूनच दिलें त्यांनी म्हणा ना !——मी बोलण्यास उठलों आणि माझ्या व कारकूनबंधूंच्या मनांतले विचार आडपडदा न ठेवितां उघडे करून दाखविले.

'पूज्य——नव्हे माननीय अधिकारी आणि प्रिय सेवकबंधु हो,' मी कडाडलों, 'येथे आपण कशाकरिता जमलों आहों हें माझ्या अगोदरच्या तीन वक्त्यांनी सांगितलेंच आहे. खरोखर हें सागण्याचें कांहीच कारण नाही. हेड क्लार्क रा. आयंगार यांनी आमच्यापैकी प्रत्येकाकडून जबरदस्तीने एकेक रुपाया वर्गणी पगारांतूनच कापून घेतलेली असल्यामुळे आजचा प्रसंग उपस्थित झाला आहे. (हा विनोद आहे असें वाटून अधिकारी हसले व मूर्खपणा आहे असें वाटून कारकून घाबरले.) आपल्या ऑफिसचे मि. टर्नबुल हे येथून बदलून सिकंदराबादेस जात आहेत म्हणून आपल्यांला झालेला आनंद व्यक्त करण्याकरिता आपण येथे जमलों आहोंत—'

'आनंद नव्हे दुःख.'–मि. विलियन्स हसत म्हणाले.

"दुःख कसलें ! आनंदच. ही कांही माझी बोलण्याची चूक नाही. हे साहेब जाणार म्हणून आम्हांला उगाच नाही आनंद वाटत. आम्हां कारकुनांची बारीकशी चूक नजरेस येतांच हे आपल्या नांवाप्रमाणे शिंगे रोखून आमच्या अंगावर धावून येत. यांना सही करण्यापलीकडे कांही अक्कल नसल्याने हे हेडक्लार्कच्या ओंजळीने पाणी पीत असत आणि त्यामुळे मस्त झालेला हा हेडक्लार्क आम्हां गरीब कारकुनांचा फार छळ करी ! आता एवढें खरें, की आमचा आनंद अगदी शुद्ध नाही. आपण या असमर्थ पण उद्धट साहेबांच्या तडाक्यांतून सुटलों तरी

बिचाऱ्या शिकंदराबादच्या कारकूनबंधूंनी आपल्यांला कींव यावयास नको काय? 'परदुःखं शीतलम्' म्हणतात तें खोटें नाही. या साहेबांच्या कारकीर्दींत आम्ही कमलेले नोकर कुचकामी ठरलों आणि हा सार–भात–खाऊ आयंगार समर्थ ठरला असें असूनहि आम्ही हा पानसुपारीचा देखावा करीत आहोंत याचें कारण काय?"–असें विचारून मी सर्व श्रोत्याकडे उत्तराच्या अपेक्षेने पाहूं लागलों.

साहेब लोक रागाने लालबुंद, आणि कारकून लोक घाबरून फिके पडले होते. सगळेजण मला खाली बसण्याची खूण करीत होते. पण स्पष्टवक्तृत्वाचें वारें प्यालेला मी थोडीच कुणाला दाद देणार! माझ्याच्याने थांबवेना––

'त्याचें कारण म्हणजे ही स्वारी शिकंदराबादहून परत पुण्यास येण्याचा संभव आहे म्हणून तिला खुश ठेवणें भाग आहे. हेच जर सेवानिवृत्त होऊन विलायतेस परत जात असते तर त्याना पानतंबाखूची चंचीदेखील कोणीं सोडून दाखविली नसती. मि. टर्नबुल याच्यामध्ये दोनच गुण आम्हांला आवडण्यासारखे होते. ते दररोज एक तास उशिरा कचेरींत येतात आणि उशिराची भरपाई करण्याकरिता एक तास लवकर परत जातात. (सौ. विलियम्स याना ही कोटि फार आवडली आणि कोंबडीच्या कलकलाटासारखा हास्यध्वनि त्यांनी काढिला.) हजर असलेल्या चार तासापैकी तीन तास हे आरामखुर्चीवर पडून झोंप घेतात. अर्थात् त्याचा जाच फक्त एकच तास आम्हाला सहन करावा लागतो. असें हें गुणी बाळ येथून जात आहे, हे सरकारचे उपकार आम्ही कधा विसरणार नाहीं. भाषण संपविण्यापूर्वी परमेश्वराजवळ इतकेंच मागणें मागतों की, हे दयाघना, टर्नबुलसाहेबाची बदली रद्द करण्याची बुद्धि तू सरकारास देऊ नको!'

भाषण आटोपून मी टर्नबुलसाहेबांशीं शेकहॅण्ड करण्यास त्यांच्या समोर उभा राहिलों. परंतु त्यांचा चेहरा फार उतरलेला दिसत होता. सर्व कारकुनांनी संगनमत करून हें मगरुरीचें भाषण उडवून दिलें असावें, असें त्यांना वाटत असावें, असें मला वाटलें. विलियम्ससाहेब खेकसले, 'ह्याला बाहेर जाण्याची विनती करा. (किक हिम औट.)' मीं स्वतः

त्या अपमानामुळे एखाद्या आमदाराप्रमाणे सभेतून वॉक-आउट केला ऑफिसांत माझ्या जागीं जाऊन बसलों.

थोड्या वेळाने आयंगार आला व म्हणाला, " जोग, काय गाढवा-सारखं भलतंच बरळलास ? विलियम्ससाहेब तर ' आइल शूट डाऊन दि ॲस ' ( मी त्या गृहस्थावर फार रागावलों आहें ) असं म्हणत होता. तो तुझा जीव घेईल; इतकंच नाही तर नोकरींतूनसुद्धा काढून टाकील ! आता तूं आजाऱ्याचं सोंग घे आणखी मी वाताच्या झटक्यांत बोललों अशी प्रतिपादणी[१०] कर."

आयंगारच्या मद्रासी उपदेशाची बजावणी करण्याचा प्रसंग तत्काळ आला. कारण विलियम्स आणि टर्नबुल असे दोघेहि ॲंग्लो-भारतीय भाषेत शिव्या देत हातात पिस्तुलें घेऊन माझा शोध करीत माझ्या टेबलाकडे येत होते. त्याना पाहाताच मीं अंगातला शर्ट टरकावून दिला, आणि शाईची दौत आयंगारच्या अंगावर फेकून देऊन, ' आहा ! मी व्हायसरॉय आहें, कमांडर इन्-चीफ[११] आहें, बादशहा आहें. टर्नबुलला मी कर्नल करीन नाहीं तर मेजर करीन. ट्रा-ला-ला ' असें बरळूं लागलों. माझी स्थिति पाहातांच साहेबद्वयास वाटलें, मला वाताचा झटका आला आहे आणि ते सहानुभूतिपर शब्द बोलून परत निघून गेले. आयंगारचा मात्र कोट खराब झाला आणि त्याबद्दल धुलाईचे चार पैसे मला भरावे लागले !

सायंकाळीं आमच्या आळींतील दासनवमी-उत्सवमंडळापुढे देशभक्त धनाजीराव वाचाळ याच्या अध्यक्षतेखाली कु. तरुणीबाईचें ' विवाहिताच्या दुसऱ्या बायका ' ह्या विषयावर व्याख्यान होऊन, नंतर श्री. बांदरलाल पोपट याच्या नकला होणार होत्या. यंदा उत्सवाचा चिटणीस मी असल्याने सभामंडप झाडणें, सतरंजी घालणें, वक्त्यांचा परिचय करून देणें इत्यादि कामें मजकडे आलेलीं होतीं.

व्याख्यात्याबाई आल्या. त्या तर मला गुरुस्थानीं होत्या. शंभर-सव्वाशे ( वर्तमानपत्री भाषेत हजारावर ) श्रोते जमा झाले. वेळेनंतर दहा मिनिटांनी अध्यक्षसाहेब मोटारींतून येऊन थडकले. मी अध्यक्षपदाची सूचना करण्यास उभा राहिलों व म्हणालों, " बंधु-भगिनी हो ! आज सुप्रसिद्ध स्पष्टवक्त्या

तरुणीबाई यांचें ‘ विवाहित पुरुष आणि त्यांच्या दुसऱ्या बायका ’ ह्या जिव्हाळ्याच्या विषयावर व्याख्यान होणार आहे. स्त्रियांना वक्तृत्वकलेची देणगी स्वभावत:च देऊन सरस्वतीदेवीनें स्त्रीजातीविषयी आपला पक्षपात व्यक्त केला आहे. ( वक्त्या—गणपतींनीं मोदक खायचा खादाडपणा पुरुषांना देऊन पुरुषजातीविषयीं पक्षपात दाखविला नाही का ? ) कालिदासानेदेखील स्त्रियांच्या ह्या गुणाला ‘ अशिक्षित-पाटवम् ’ म्हणजे अशिक्षितांची तोंडपाटिलकी असं नाव दिलं आहे. ( हशा. ) ह्या प्रसंगीं देशभक्त वाचाळ यांच्यासारखे अध्यक्ष आपल्या कपाळीं यावे हो शोचनीय गोष्ट होय. शालजोडीला कांबळ्याचं ठिगळ जोडाव त्याप्रमाणे तरुणीबाईंच्या फुटाण्या आणि फटाक्या व्याख्यानाला असल्या कंटाळवाण्या अध्यक्षाची प्रस्तावना जोडली जाणार आहे. ( प्रचंड हशा. ) मग असले रद्दड अध्यक्ष नेमलेत कां, असं तुम्ही विचाराल तर माझं उत्तर इतकंच की, देशभक्तांनीं आपल्या उत्सवाला सगळ्यात जास्त मोठी वर्गणी दिली आहे, अन् मंडपाच्यामध्ये लोंबकाळणार हें सुंदर झुंबर त्यांच्याच घरचं आहे, म्हणून त्यांना हा अध्यक्षपदाचा मान निरुपायानं द्यावा लागत आहे. ( माझ्या अंगरख्याच्या टोकाला झटका. ) अध्यक्षपदाच्या मानाला हे मुळींच योग्य नाहीत; पण ह्या मतलबी जगतात योग्यतेपेक्षा व्यवहाराकडे अधिक लक्ष पुरवावं लागतं, हें ध्यानात आणून आजच्या योजनेला सर्वांनी संमति द्यावी. ( खूप केली सेक्रेटरीसाहेब ! टाळ्या ! हशा ! ) आता अध्यक्ष आणि व्याख्यात्या ह्या दोघांनाहि इतकीच विनंती आहे, की आज येथे बरेचसे श्रोते जमले आहेत ते आपलं व्याख्यान ऐकायला जमले नसून, व्याख्याना-नंतर श्रीयुत वादरलाल पोपट यांच्या नकला होणार आहेत त्या ऐकायला जमले आहेत. तरी आपलीं चऱ्हाटं फारशीं न लांबविता त्यानी आपलं काम आटपावं. ”

मी हें भाषण करीत असतां व्याख्यात्यांची हमून मुरकुंडी वळत होती आणि अध्यक्ष रागाने लालबुंद होऊन माझा अंगरखा ओढीत होते असें मला नंतर कळलें. अध्यक्ष माझें भाषण संपण्याच्या आतच उभे राहिले होते. ते ओरडले, ‘ बस बस ! सेक्रेटरीमहाराज ! आपला फाजीलपणा पुरे करा.

हा माझा अपमान आहे. मी अध्यक्षपदाला लायक नव्हतों तर बोलावलं कशाला मला, शेण खायला ? '

' आम्ही कधी आपल्याला बोलवायला गेलों होतों, दादासाहेब ! उलट तुम्हीच व्यवस्थापक मंडळाच्यामागे लागला होता की तरुणीबाईंच्या व्याख्यानाला मला अध्यक्ष करा म्हणून ! ' हे माझे शब्द ऐकून वाचाळाचें लाल तोंड निळें झालें. त्यानी आपल्या नोकराना बोलावून ताबडतोब मुंबर काढून घेतलें आणि ते आपली सतरंजी मागू लागले. पण श्रोते कमले खमंग ! ते सतरंजीवरून उठेनात. शेवटीं अध्यक्ष तावातावाने आपल्या पत्नीसह सभास्थानांतून निघून गेले.

तरुणीबाईंनी आपलें विगताध्यक्ष भाषण पुरें केलें आणि सरतेशेवटीं त्या म्हणाल्या, 'माझं भाषण अगदीं अप्रिय वाटलं असेल तुम्हांला. दासनवमीचा उत्सव म्हणजे एक सनातनी कुजलेल्या विचारांचं प्रदर्शन करण्याचं ठिकाण न समजतां राष्ट्रांत नवचैतन्य ओतण्याचा तो दिवस आहे हें आपण ओळखलं आहे असं मला वाटतं. मला आमंत्रण देऊन आपण जो गौरव केला आहे त्याबद्दल आपले आभार मानून मी आपली रजा घेत्यें. आता बोलण्याला वेळ नाही; काम करून दाखविलं पाहिजे. शब्द, शब्द, शब्द ! असं हॅम्लेटमध्यें[१२] म्हटलं आहे तशी आपली स्थिति झाली आहे. कार्य, कार्य, कार्य ! अशी स्थिति झाली पाहिजे. असो. याहून अधिक वेळ मला घेता येत नाही, कारण रात्रीं दुसरीकडे व्याख्यान देऊन मला उद्या सोलापुरास व्याख्यानाकरिता जायचं आहे. '

व्याख्यातीचे आभार मानताना मीं सांगितलें, ' आताच बाईंनी सांगितलं की आम्ही त्यांचा गौरव केला. तसं समजण्याला मुळींच कारण नाही. आमच्या वर्गणीच्या रकमेंत कथाकीर्तन किंवा गायन ठेवण्याची शक्ति नव्हती. व्याख्यात्याला बिदागी द्यावी लागत नाही, म्हणून व्याख्यान करण्याचंच आम्हीं ठरवलं. पहिल्यांदा आम्हीं केळकर, पोतदार आळतेकर[१३] वगैरे नामांकित वक्त्याना बोलावणीं केलीं. पण त्यांपैकीं सगळ्यांनीं नकारघंटा वाजवल्यामुळं आजच्या व्याख्यात्याना आम्हीं बोलावलं. तेव्हा त्यांनी आमंत्रणाबद्दल आमचे आभार मानण्याचं कांही कारण नाही. उलट

त्या इथं व्याख्यान देण्याला आल्या म्हणून आम्हीहि त्यांचे आभार मानण्याचं कारण नाही. त्या परगावाहून इथे व्याख्यान देण्याकरिता म्हणून ज्या आल्या त्या निरनिराळ्या तीन उत्सवांतून भाडं वसूल करीत आलेल्या आहेत—'

' अगदी खोटं! अगदी खोटं! '—व्याख्यात्या रागाने उसळल्या.

' कांही खोटं नाही. ' मी ठासून म्हणालों, ' आमचा उत्सव, गायकवाडवाड्यांतला उत्सव अन् श्रीमती नाथीबाई दामोदरदास विठलदास टाकरसी कन्यापाठशाळेचा उत्सव, अशा तीन ठिकाणांतून आजच्या व्याख्यात्यांना अकोला ते पुणें भाडं मिळायचं आहे. तेव्हा दोन भाडीं त्यांचा फायदाच होणार आहे. आता राहिले श्रोत्यांचे आभार. तेहि मानण्याचं कांही कारण नाही. आपण या व्याख्यानाकरिता आलेले नसून नकलाकरिता आलेले आहात. त्या आता सुरू होतील. '

बोलणें संपवून माझी पाठ फिरते तोंच तरुणीबाई ' अहो सेक्रेटरी !' असें ओरडल्या. मी त्यांच्याकडे वळून ' काय ? ' असें खुणेने विचारलें. ' तुम्हांला काही शिष्टाचार समजतो आहे कीं नाही ?' असें त्यांनी मला विचारलें.

' शिष्टाचाराचा काय संबंध आहे इथं, बाई ? कालच तुम्हीं व्याख्यानात सांगितलत ना, की तुम्ही स्पष्टवक्ते व्हा, आपलं मन आडपडदा न ठवता स्पष्टपणानं सांगा, असं ? माझं हें स्पष्ट बोलणं ऐकून आपल्यांला योग्य चेला मिळाल्याबद्दल तुम्हाला आनंदच वाटायला पाहिजे--'

' नॉन्सेन्स ! व्याख्यांनातलं बोलणं कधी खरं धरावयाचं असतं का ? व्याख्यानांतल्या आज्ञा आणि जाहिरातींतील आज्ञा एका कानानं ऐकून दुसऱ्या कानानं सोडून द्यायच्या असतात. तुम्हीं माझा भयंकर अपमान केला आहे आणि याबद्दल तुमची चागलीच खोडकी जिरवण्याचा माझा विचार आहे.'—— असें व्याख्यात्या तावातावाने बोलत असतां त्यांस मीं दूध घेऊन जाण्याची विनंती केली. इतर श्रोते मंडळींनी माझ्या विचित्र वक्तृत्वाबद्दल माझी कानउघाडणी करून तरुणीबाईंची माफी मागण्यास

सांगितलें. माफी मागण्यापेक्षा सेक्रेटरीपणाचा राजीनामा देणें पत्करून मी संतापाने घरीं आलों.

दाराशींच सौभाग्यवती संताप आणि दुःख या विकारांनीं लाल होऊन गेलेली दिसली. "शहाणपणाची कमाल झाली आता बाई! 'काय' म्हणून काय विचारता? काल बिचाऱ्या शंकराला भलतं सलत सांगून सोडलं. त्याची आता दातांखळी बसली आहे. लागलीच आता काकांच्या घरीं जाऊन त्याला धीर द्या; आणखी काल आपण बोललों ते शुद्धींत बोललों नाही असं कबूल करा. तरच तो पोरगा हातीं लागण्याचा संभव आहे.'

'शुद्धींत म्हणजे? मी कांही दारुबिरू पिऊन बोललों कीं काय?' असें माझें वाक्य पुरें होण्याच्या आतच तिने मला, ओढून म्हणाना का, काकांच्या बिऱ्हाडाकडे जाण्यास लावलें,

त्या पोराच्या समजुतीकरिता मला खोटें बोलावें लागलें, कीं मी बोललों त्या वेळीं शुद्धींत नव्हतों, आणि मला नसलेल्या व्यसनाचा आरोप स्वतःवर ओढून आणावा लागला.

आई रागावून नाशिकला गेल्यामुळें स्वयंपाकाचें काम तिच्या सुनेवरच पडलें. अर्थात् धाकट्या साळूला संभाळण्याची कामगिरी अस्मादिकांवर आली. रात्रीं मोरूला विंचू चावला तेव्हा नथूशेठकडे औषध आणण्यास गेलों. 'औषध णाही बुवा'—नथूशेठ म्हणाला.

'कां बरं, संपलं कीं काय?'—मीं विचारलें.

'संपलं णाही, पन पष्टच सागायचं म्हणजे, तुम्हांला कोनतीहि जिण्णस द्यायची णाही असं म्यां टरवलं आहे.' असें सडेतोड उत्तर देऊन नथूशेठनी खाडकन् दार लावून घेतलें.

त्या वेळेपासून स्पष्टवक्तेपणाची मला इतकी शिसारी बसली आहे, कीं माझ्या तोंडून चुकूनदेखील खरा शब्द येईनासा झाला आहे. स्पष्टवक्ता मनुष्य हा लुच्चा माणसापेक्षा अधिक भयानक असतो असें मला वाटूं लागलें आहे. हल्ली माझे संवाद कसे फिरकीदार होऊं लागले आहेत त्याचा मासला सांगतों. चि. मोरूच्या मुंजीस रा. पवार यांना आमंत्रण देण्याचें मी विसरलों. पवार जेव्हा मला भेटले तेव्हा ते मला रागावून म्हणाले,

' काय रे जोग, मुलाच्या मुंजीला मला नाही बोलावलं ? विसरलास कीं काय आपली मैत्री ? '

मी—म्हणजे ? तूं इथंच होतास कीं काय त्या वेळीं ? मला वाटलं तूं बाहेरगावीं गेला असशील. म्हणून नाही बोलावणं पाठविलं.

पवार—तरीच; मला वाटलं कसा विसरशील ! मी इथं आहें, हें तुला माहीत आहे, असं मला वाटलं होतं, म्हणून मी रागावलों.

मी—मला फारच वाईट वाटतं याबद्दल. तूं इथं आहेस, हें मला माहीत नव्हतं, तें तुला माहीत नाही, हें मला माहीत नाही ! इत्यादि, इत्यादि अनंतापर्यंत.

एखाद्यानें पूर्वेकडील ठिकाणाचा रस्ता विचारला तर त्याला सरळ पश्चिमे-कडे बोट दाखवावयाचें, अशी आता मला सवय लागलेली आहे !

✦ ✦

## टीपा

(१) नीतिमद्यान झिंगलेले – कु. तरुणीबाईंना जुनीं नीतितत्त्वें पसंत नाहीत म्हणून त्यांनी त्यांना मद्याची उपमा दिलेली असून, सनातनी त्या मद्यानें झिंगलेले आहेत, असें म्हटलें आहे. (२) नरो वा कुंजरो वा पद्धतीचें बोलणें – ' मनुष्य असेल किंवा हत्ती असेल ' असें भारतीय युद्धांत धर्मराजानें उत्तर दिलें, तसें बोलणें हेंहि असेल किंवा तेंहि असेल, असें गुळमुळीत बोलणें. (३) मुमुक्षु – मोक्षाची इच्छा करणारा. अर्थात् अशा पत्रांत पारमार्थिक विषय असणार. या नावाचें एक पत्र ह. भ. प. पांगारकर चालवीत असत. (४) शिकाऱ्याची चाहूल लागली कीं शहामृग आपलें तोंड वाळूंत खुपसतें. मग त्याला शिकारी दिसत नाही आणि त्याला वाटतें, कीं ज्या अर्थी आपणाला शिकारी दिसत नाही त्या अर्थी आपणहि शिकाऱ्याला दिसत नसूं ! म्हणून, शहामृगाचा खेळ म्हणजे प्राप्त परिस्थितीकडे पाठ फिरवून

ती परिस्थितिच नष्ट झाली, अशा भ्रमांत राहाणे. (५) ग्रहवैद्यक – घरगुती औषधाची माहिती देणारें जुने पुस्तक. (६) मध्यम कक्षा – इंटरमीजिएटची परीक्षा. ही महाविद्यालयांत दुसऱ्या वर्षाच्या शेवटी घेतात. (७) परमेश्वरी नोटा – प्रॉमिसरी नोटा. कर्जफेडीबद्दलची आश्वासनपत्रे. (८) माननीय – ज्याचा हुकूम नाइलाजाने मानावाच लागतो असे, हा अर्थ येथे घ्यावयाचा. (९) शेकहण्डी – शेक हॅण्ड – हस्तांदोलन (१०) प्रतिपादणी – बतावणी. (११) कमांडर-इन्-चीफ – मुख्य सेनापती. (१२) हॅम्लेट हें महाकवि शेक्सपियरचे जगप्रसिद्ध इंग्रजी नाटक. (१३) केळकर – साहित्यसम्राट् न. चि. केळकर. पोतदार – महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार आळतेकर – प्रा. मा. दा. आळतेकर.

## अभ्यास

(१) स्पष्टवक्ता मनुष्य हा कुत्र्याच्या माणसापेक्षा अधिक भयानक असतो, असे चिमणरावाला का वाटू लागले ?

(२) आलेल्या अनुभवामुळे चिमणरावाच्या तोंडून चुकूनदेखील खरा शब्द येईनासा झाला. चिमणरावाचे अनुभव तुम्हाला आले असते तर तुम्ही कोणता बोध घेतला असता ?

(३) कुमारी तरुणीबाई, निर्लज्ज पंत, मि टर्नकोट, श्री. बादरलाल पोपट व दे. भ. धनाजीराव वाचाळ या प्रत्येक नावावरून लेखकाला काय सूचित करावयाचे आहे ?

(४) या कथेत पुढील वर्गाची कोणती विगे उघड केली आहेत ? १ सार्वजनिक व्याख्याने, २ अध्यक्ष, ३ व्याख्यानाला येणारे श्रोते, ४ अधिकाऱ्याला पानसुपारी करणारे लोक, ५ उत्सवाचे व्यवस्थापक, ६ सोवळ्या वृद्ध स्त्रिया, ७ लग्न जमवू पाहाणारा वरपक्ष व वधूपक्ष.

(५) "कोंबडीच्या कलकलाटासारखा हास्यध्वनि त्यांनी काढला" – यासारख्या विनोदी उपमा या कथेतून हुडकून काढा.

(६) पुढील वाक्यांमधील मर्म तुम्हांला समजलें का ? नसल्यास समजून घ्या. (अ) 'गरुड पुराण किंवा महाभारतांतलं स्वर्गारोहणपर्व वाचून दाखवलं तर बिचाऱ्याला परलोकांत तरी त्यांचा काही उपयोग होईल !' (ब) मी पुण्याचा माणूस सातारच्या या माव्याभोळ्या म्हाताऱ्यास काय दाद देणार ? (क) खुशाल तुम्ही कोंबडीचीच काय पण गोमातेचीसुद्धा अंडीं खा. (ड) 'त्याला बाहेर जाण्याची विनंती करा. (किक हिम औट)' (इ) 'आइल शूट डाऊन दि अॅस. (मी त्या गृहस्थावर फार रागावलो आहे.)' (फ) कुमारी तरुणीबाईचे 'विवाहिताच्या दुसऱ्या बायका' या विषयावर व्याख्यान . . . (ग) यदा उत्सवाचा चिटणीस मी असल्यानें सभा-मंडप झाडणें, सतरजी घालणें, वक्त्याचा परिचय करून देणें इत्यादि कामें मजकडे आलेली होतीं.

(७) 'गोड बोलण्याचे प्रयोग' किंवा 'वक्तशीरपणाचे प्रयोग' या नावाची विनोदी गोष्ट लिहिण्याचा प्रयत्न करा

✦ ✦ ✦

# स्टेशनस्टाफची मेजवानी : ८ :

( लड्डूपुर स्टेशन. स्टेशनमास्तरची खोली. गलमिशावाले[1]
व लांब केस वाढवून भांग काढलेले
धडफळे मास्तर.)

धडफळेः—अलीकडे व्यापाराचा स्लॅक सीझन[2] झाल्यापासून रेल्वे-नोकरांचे फार हाल सुरू झाले आहेत. पूर्वी वॉर-टाइममध्ये एक वॅगन व्यापाऱ्याला द्यायला पंचवीस रुपये न् एक गामडी[3] नाहीतर पार्सल रवाना करायला रुपया दोन रुपये हक्कत होतो. आता उलट, बाबांनो या. रेल्वेनी सामान पाठवा अशी व्यापाऱ्यांची पायधरणी करावी लागत आहे! पॅसेंजर-ट्रॅफिक तर या मोटार बसेसनी ठार बुडायची पाळी आणली आहे. तरी आम्ही जिथं जिथं आगगाडीची फाटकं आहेत तिथे तिथे रस्ते उखडून, नाही तर फाटक तास तास बंद करून मोटारींची खोटी करतो. ( टेलिफोनची घंटा वाजते.) वेध, गोंद्या लेका, शंख करीत! पांच मिनिटं प्रेक्षकांशीं स्वगत बोलत बसलेलं या गाढवाला खपत नाही. लागला टरांव टरांव करायला बेडकासारखा. आता रिट्रेंचमेंटची[4] कात्री लागून शंकऱ्याला टी. सी.[5]च्या जागेवर चिकटवून दिलं आहे ती जागा न जावो म्हणजे झालें. ( पुनः टेलिफोनची घंटा. त्रासात्रासाने जाऊन टेलिफोनची नळी घेतो.) हं. काय आहे रे गोंद्या! तुला बसल्या उद्योग नाही दुसरा. काय

म्हणतोस, रामभाऊला पाठविलं आहेस गुड्सनी[६]? ठीक. शास्त्रीबुवांचं आज प्रवचन आहे. तें आटपून उद्या निघतील झाशीच्या दक्षिणी मंडळांत सुधारकाच्या भ्रष्टाकारावर व्याख्यान द्यायला—तुझ्याकडे उतरतील बरं, फराळाला—

शास्त्रीबुवा (लड्डूपुरातले पाहुणे प्रवेश करून):—काय, मास्तर-साहेब! काल मीं अशी सोळा आणे उडवली या सुधारकांची! लुच्चे बेटे! यांना खाण्यापिण्याचा कांहीं विधिनिषेध नाही. खुशाल परजातीच्या हातचं खातात पितात. सहभोजन म्हणे! शिवाजीबाजीरावांनी एवढीं राज्यं कमावलीं तीं काय सहभोजनं करून? (ढेकर देऊन) ओः या! गोविंद, गोविंद! आजचा तुमच्या महाराष्ट्र समाजाचा बेत फारच चांगला होता बुवा. बृहन्महाराष्ट्राच्या[७] प्रत्येक शहरांत असा दक्षिणी समाज स्थापन झाला तर आमच्यासारख्या धंदेवाईक व्याख्यात्यांना महाराष्ट्रांत परत जायची इच्छाच व्हावयाची नाही. अगदी अजीर्ण झालं बुवा!

धडफळे—मग रिफ्रेशमेंटमधलं[८] सोडावॉटर घ्या की बाटलीभर! बिहारी, एक ग्लास सोडाआईस घेऊन ये. (रिफ्रेशमेन्ट-रूम-बॉय[९] बिहारी-लाल तबकावर ग्लास टेवून शास्त्रीबुवांच्यापुढे धरतो.)

शास्त्री०:—अरे, खाली रखो, खाली रखो. मेरेको शिवता है का? (तो खाली टेवतो. शास्त्रीबुवा सोडा पितात.) हाच एखादा सुधारक असता तर या घेडाच्या हातून त्यानं ग्लास घेतल असतं. वाः! सोडा तर अगदी बेष आहे. मुंबईच्या ड्यूक कंपनीचा सोडा जसा कडक असतो—

धडफळे:—म्हणजे! शास्त्रीबुवा, आपण ड्यूकचा सोडा प्याला होतां वाटतं?

शास्त्री०:—अहो मास्तर, हे सुधारक हॉटेलांत जाऊन काय खातात पितात, किती बहकले आहेत, हें पाहायला मला त्यांच्यावर नजर टेवायला मधून मधून युरोपियन हॉटेलांत जावं लागतं. त्याशिवाय वस्तुस्थितिदर्शक प्रवचनं मला कशीं करतां येतील? फार तर काय, युरोपियन लोकांचा धिंगाणा अन् त्यांच्या सुधारणांचा पिंगा पाहायला मी मधून मधून बॉल्सनादेखील[१०] जातों खरा; पण श्रीकृष्णांनी सांगितल्याप्रमाणे माझी

आसक्ति मात्र या धर्मावर नाही.[११] काय समजलां? शंकराचार्यांनीसुद्धा परकायाप्रवेश करून संसाराचीं सुखं अनुभवलींच कीं नाहीं![१२]

नथोबा पार्सलक्लार्क (प्रवेश करून):—साहेब, आज पांच पार्सलं हैदराबादेहून आलीं आहेत. कालपासून पडलीं आहेत. मुंग्या येऊन खराब झालीं तर रिस्पॉन्सिबल[१३] कोण?

धडफळे:—अरे, पण मुंग्या कशाला शिरतील पार्सलांत?

नथोबा:—वर चक्क लिहिलं आहे ढोबळ अक्षरांत स्वीटमीट (मिठाई) म्हणून न् मुंग्यान यायला काय दिवाण्या[१४] झाल्या आहेत? त्यापेक्षा साहेब, शास्त्रीबुवाची स्वारी आली आहे, आपण स्टेशनस्टाफमार्फत[१५] त्याना फीस्ट देऊं म्हणजे झालं! वजन सारख करायला फत्तर आहेतच. अन् खी बॅलस्ट ट्रेन[१६] शटिंग[१७] करून राहिली आहे यार्डमध्ये.[१८]

धडफळे:—बरं, जा. बोलावून आणा सगळ्या मेंबर्सना (तो जातो.)

रामप्रसाद दुबे (लाब केस, तुळतुळीत दाढीमिशांवाले सिग्नलर[१९] येतात):—काय साहेब, काय फर्मान[२०] आहे?

धडफळे:—बैस जरा आज. मिठाईचीं पांच बास्केट्स[२१] आलीं आहेत. आमच्या दक्षिणचे विद्वान् शास्त्रीबुवा आहेत. त्यांना आपण फीस्ट देऊं. (पोर्टर पाच करंड्या आणून ठेवतात. नथोबा आणखी दोन नोकर येतात.)

रामप्रसाद:—बरं आहे, साहेब. मी फिफ्टीन डाऊनच्या[२२] लाइन क्लियरचा इतेजाम[२३] करून येतों.

धडफळे:—अरे, बैठ जाव. फिफ्टीन डाऊन म्हणजे कांही फॉरेन मेल[२४] लागून गेली नाही. आम्ही तर इथे पंजाब मेलला सिग्नलपाशीं दहा-दहा मिनिटं कोकलत ठेवतों तर फिफ्टीन डाऊनची काय कथा? हं. काढ. या करंडींत काय आहे? जिलब्या! वा:! वा:! फारच सुंदर! पुण्याच्या मॅरेज सीझनची[२५] आठवण होते या पाहून. आणखी हें काय बुवा? धीवर का धीवर म्हणतात तें दिसत आहे.

शास्त्री०:—'काय केलें जळचरीं, धीवर त्यांच्या घातावरी!' काय तुकोबांची वाणी आहे![२६] नाही तर आधुनिक कवि—कोणी फाटक्या जोड्यावर कविता करतो तर कोणी फुटकी तपेली पाहूनच पाघळायला

लागतो. आता हीं पार्सलं पाहूनच अमृतरायाच्या[२१] रसाळ वाणीची



" वसन ढिलावत सरळ कंठ आकंठ भरित ! "

आठवण होते. ' दळे, मुगदळे, गुळपापडी; ( एक लाडू खात ) शंकर-पाळे, घारगीं, घिरडीं, मालपुवे, अती साजूक नाजूक अपूप बरफी, सुस्वाद मनोहर मिटक्या देउनि, वसन ढिलावत सरळ कंठ आकंठ

( सबंध लाडू तोंडांत कोंबून ) भरित ! ' याला म्हणतात विनोद. नाही तर त्या कोल्हटकराचा[२८] टारगटपणाच आजकाल विनोदाच्या नांवाखाली विकला जात आहे. ' स्थान नसे अणुमात्र उदरीं धापा देत उताणे पडले—' ( खूप हसून विनोद उत्पन्न करतो. ) बोला, एका तरी आजच्या कवीला पक्वान्नावर कविता करतां येईल काय ?

कोचिंग क्लार्क[२९]:—अहो, या भुकेकंगाल कवींना भाजीभाकरी मिळायची पंचाईत. पक्वान्न त्याच्या नजरेला तरी ( एक चकली खात ) पडलीं पाहिजेत ना ?

नथोबा--सर्वच कुठे रेल्वेसर्व्हंट असतात? ( मास्तर रागावून दृष्टि फेकतात. नथोबा गार होतो )

शास्त्रीबुवा:--' शिऱ्यासकट गट पुऱ्या, बऱ्या गुरवळ्या, काचोऱ्या सांजोऱ्या, सायसहित शेवाया, शर्करा पायस लुचया, मांडे पाढरवर्ण पूर्ण पोळीया । घृतें घोळिल्या ( एक मोठा बोकाणा भरून ) द्विजें गीळिल्या, साखरफेण्या घिवर घारगे, मोतीचूर जिलेबी दळिया, सोळाहजार पदार्थ आले निजभाग्यें भोजनीं अन्नब्रह्मरसानुभवें विप्र जेविला.' अन्न हेंच ब्रह्म आहे. आणखी या ब्रह्मसुखाचा अनुभव तुम्हीं या गरीब सुदाम्याला करून दिलात---

सर्व स्टाफ:--कसचं ! कसचं !

रामप्रसाद:—और इस क्वार्डीमे[३०] क्या है ! ओ हो ! ए तो पापड, पाण्डी, कुरडी, सांडगा ! अपने रामभाऊला हा तेलाचा मिठाई लई आवडता.

रामभाऊ ( गुड्स क्लार्क ):--म्हणूनच मी तेलबुद्धि झालों आहे.

नथोबा:—-म्हणून नाही काही. मागे तू बर्मा ऑईल कंपनीच्या टाकींतल तेल लाववलंस तेव्हापासून तेलबुद्धि—

धडफळे:--नथोबा, शट् अप. [३१]तू जर एवढा मत्यवादी लागून गेला असलास तर शाळामास्तर हो. रेल्वेतली नोकरी आमच्यासारख्या लबाड ( शब्दावर जोर देऊन ) लोकाकरिता आहे. आता तर बुवा आपलं

पोट भरलं. ( लांबून शिटी ऐकूं येते. ) अरे रामप्रसाद, तुझं पोट भरलं असलं तर आता सिग्नल दे. आज तो शापुरजी ड्रायव्हर आहे. महा कटकटी ! बाकी त्यालाहि यांतला थोडा प्रसाद देऊं म्हणजे गप्प बसेल.

**रघुवीर पोर्टर**:—मास्तरसाब, हमकुबी कुछ खिलाव[३२]पार्सलका प्रसाद.

**धडफळे**:—नथोबा, या लोकांना कागदावर थोडं थोडं सगळं द्या वाटण्या करून. अन् बाकीच्याचे पुडे बांधा; घरीं घेऊन जाऊ. ( नथोबा तसें करतो. इतक्यात दोनचार इसम फेटेवाले, मलमलीचे सद्रे व गुडघ्याइतकीं धोतरें नेसलेले येतात.)

**१ ला इसम**:—साहेब, पार्सल-मास्तरसाहेब कुठे आहेत ?

**नथोबा**:—मी आहें. बसा जरा.

**शास्त्री०**:—मास्तरसाहेब, खाऊन खाऊन प्राणांतिक अवस्था आली ! आता सोडावाटरची लज्जत पाहिली पाहिजे. ( मास्तर सोडा आणवितात. सर्व पितात. ) आता स्टेशनस्टाफ एखाद्या बाटग्या सुधारक क्लबासारखा दिसतो आहे ! ' वेष असावा बावळा । परी अंतरीं नाना कळा ! ' असा बावळा पोषाख करून सुधारकाचीं बिंग फोडलीं पाहिजेत.

**२ रा इसम**:—(पहिल्यास) अरे, हे तर आपलेच पार्सल दिसतात ! ( नथोबास ) पार्सलसाहेब, ही रसीद घेऊन आमचे पाच पार्सल देऊन द्या ना. नाही तो कीडीबीडी येईल.

**नथोबा**:— कसलीं पार्सलं आहेत तुमचीं ?

**१ ला इसम**—मिठाई आहे, साहेब. हैदराबादेकडून आमचे सगे[३३] आहेत त्यानी भेजून[३४] दिले आहेत. ( नथोबा चपापतो.)

**नथोबा**:—इकडे द्या रिसीट.( त्याना शिवूं न देता जमिनीवर रिसीट ठेवून व ती उचलून ) अरे, हींच तीं पार्सलं ! या गद्ध्याना आताच यायला फावलं ! काय रे, तुम्हाला लेट झाला म्हणून रेल्वेच्या कायद्याप्रमाणे आम्हीं या करंड्या फोडून टाकल्या. (ते निराश होतात.) कोण रे, तुम्ही कोण लोक आहात ?

**१ ला व ३ रा इसम**:—आम्ही मेहतर आहों, साब.

शास्त्री०: मेहतर म्हणजे ? महत्तर[३५] कीं काय ?

३ रा:—मेहतर म्हणजे भंगी ( शास्त्रीबोवांचे डोळे पांढरे होतात. स्टेशनस्टाफला विजेच्यासारखा धक्का बसतो.)

धडफळे:--बरं झालं, तरी तुमचे हात अजून या पार्सलांना लागले नव्हते. अरे, पण हीं पार्सलं चांगल्या लोकांनी तरी धाडलीं होतीं ना ?

शास्त्री०:—( काकुळतीने ) अरे, 'होय' म्हणा रे !

१ ला मेहतर:—चांगल्या लोकांनी म्हणजे ? माझे सगेसोयरे काय वाईट आहेत ? अहो, हैदराबादच्या नबाब सदरत-उल मुल-नबाबखां बहादर साहेबाच्या मुलाची शादी[३६] झाली. दहा हजार लोक मेजवानीस आले होते ! नुसत्या उष्ट्यावर हजार भिकार पोसत होते ! त्यांच्या मेजवानींत उरलेले जिन्नस त्यांनी वांटून टाकले. आमच्या सग्या-सोयऱ्यांनाबी मिळाले. पण आमची आठवण ठेवून त्यांनी आम्हाला पार्सल धाडले.

२ रा:—पण आमच्या नशिबांत कुठलं असं सोन्यासारखं अन्न खायला ? ठेसनावर मास्तर लोकानींच पार सप्पा उडवला.

शास्त्री०:—(दु:खाने छाती बडवीत) हाय हाय ! अरे, ह्या जिनसा फराळाच्या हात्या असं तरी म्हणा रे ! मुसलमानाच्या मेजवानींतले उष्टे पदार्थ भंगी लोकानी घेतले न् आम्ही ते आवडीने पोटात ढकलले. जळो तें जिव्हालौल्य[३७]! ह्या जिभेला किडे कां नाहीं पडले ?

नथोबा:—रेल्वे सर्व्हंटांनो, पार्सल फोडण्यापूर्वी नीट विचार करीत जा. नाहीं तर पश्चात्ताप करण्याची पाळी येईल.

शास्त्री०:--आता पश्चात्तापानं काय व्हायचं आहे ?सक्षौर प्रायश्चित्त घ्यावें लागेल काशीस जाऊन !

धडफळे:—आता यंदा आम्ही देशीं[३८] जाणार होतों पास घेऊन; त्याबद्दल काशीसच जावं लागणार ! अन् या गलमिशा ( त्यांच्यावरून हात फिरवीत) अन् हे केस! त्यांच्यावरून वस्तरा फिरणार! शिव शिव !

**रामप्रसाद:**—और मेरी भी उमदी दाढी और मूछी[४] गंगामें डुब जावेगी !

**नथोबा:**--कुछ फिकीर नहीं. या जमान्यात दाढीमिशा ठेवायच्याच नसतात. बरं झालं आयती संधि आली दाढीमिशा काढायची. एकदा काढल्या की पुन: वाढवायला नकोत !

**मेहतर:**—पण आमचे पार्सल, साहेब ?

**नथोबा:**--हीं घ्या. (रिकाम्या करड्या देतो.) आंत फत्तर घालायचे राहिले ते घ्या तुम्हीच भरून. बालाष्ट गाडी सायडिंगवर[५] उभी आहे !

**मेहतर:**--चला रे चला. ही बातमी गावभर पसरूं अन् पाहू यांना जातींत कोण ठेवतो तें !

**शास्त्री:**—अरे, नको, नको ! पाया पडतों— (सर्व स्टाफ विनंती करतो; पण ते तसेच चालत होतात. शास्त्रीबुवा 'हाय रे देवा !' करीत पडतात. सगळा स्टाफ चिंतामग्न होतो.)



स्थळ--श्री क्षेत्र काशी, दुर्गाघाट. पहिल्या प्रवेशांतील सर्व पात्रें आपल्या देहांतून उमदे केशकलाप व मिशा--रामप्रसादाच्या बाबतींत दाढी—वजा देऊन प्रायश्चित्तविधीस बसले आहेत, असें दृश्य दिसतें. या प्रवेशांत भाषणें करण्यासारखी पात्रांची मनःस्थिति राहिली नाहीं; म्हणून हा मूकप्रवेश दाखवून पडदा पाडणें भाग आहे असा मूकप्रवेश घालण्याचा उपक्रम आम्हींच प्रथम केला आहे.



**टीपा**—

(१) गलमिशा – गालावर गेलेल्या कल्लेदार मिशा. (२) स्लॅक सीझन – मंदीचा काळ. (३) गासडी – गठ्ठा. (४) रिट्रेंचमेंट – नोकरकपात.

(५) टी. सी. – टिकीट कलेक्टर. (६) गुड्स – मालगाडी (७) बृहन्-महाराष्ट्र – महाराष्ट्राच्या मुख्य सीमेबाहेरील महाराष्ट्रीय वस्तीचा प्रदेश. (८) रिफ्रेशमेंट – उपहारगृह. (९) रिफ्रेशमेंट–रूम–बॉय – हॉटेल-मधला पोऱ्या. (१०) संसारात राहून त्यावर आसक्ति ठेवू नये, कर्तव्य-बुद्धीने सर्व व्यवहार करावा, असे श्रीकृष्णाने गीतेत सांगितले आहे. श्रीकृष्णाचा उलटा आधार येथे शास्त्रीबुवा देतात. (१२) शंकराचार्यांनी संसाराचा अनुभव घेण्यासाठी दुसऱ्याच्या शरीरात प्रवेश केला होता, अशी आख्यायिका आहे. (१३) रिस्पॉन्सिबल – जबाबदार. (१४) दिवाण्या – वेड्या. (१५) स्टेशनस्टाफ – स्टेशनवरील नोकरवर्ग. (१६) बॅलस्ट ट्रेन – खडी वहाणारी गाडी. (१७)शंटिंग करणे–डबे काढण्याघालण्यासाठी गाडीची पुढेमागे हलवाहलव करणे. (१८)यार्ड – आवार (१९) सिग्नलर – सिग्नल देणारा. (२०) फर्मान–हुकूम. (२१) बास्केट्स–टोपल्या. (२२) फिफ्टीन डाउन – पधरा नंबरची खालच्या बाजूस जाणारी गाडी. (२३) लाइन क्लियरचा इंतेजाम करून येतो – रस्ता मोकळा आहे की नाही याची व्यवस्था लावून येतो. (२४) फॉरेन मेल – विलायतचे टपाल नेणारी गाडी (२५) मॅरेज सीझन – लग्नाचा मोसम. (२६) धीवर – कोळी 'जळचरांनी कोणता अपराध केला म्हणून कोळी त्याचा घात करायला बसलेला असतो ?' हा तुकोबाच्या वाणीचा अर्थ. तुकोबाचा उनागा शास्त्रीबुवांनी येथे संबंध नसता दडपून दिला आहे! (२७) अमृतराय – एक जुना मराठी कवि. (२८) 'सुदाम्याचे पोहे' लिहिणारे श्री. कृ. कोल्हटकर. (२९) कोचिंग क्लार्क – उतारूंना तिकिटें देणें व त्यांच्या सामानाचे पैसे घेणे ही कामे करणारा कारकून. (३०) छाबडी – टोपली. (३१) शट् अप् – गप बैस. (३२) खिलाव – खायला द्या. (३३) सगे – नातेवाईक. (३४) भेजणें – पाठविणें. (३५) महत्तर – फार थोर. (३६) शादी – लग्न. (३७) जिव्हालौल्य – जिभेची हाव (३८) मक्षौर प्रायश्चित्त – हजामत करून घ्यावयाचें प्रायश्चित्त. (३९) देशी – जन्मगावी (४०) मूछी – मिशी. (४१) सायडिंगवर – मुख्य रुळाच्या बाजूच्या रुळांवर.

## अभ्यास–

(१) स्टेशनवरील नोकरवर्ग आणि शास्त्रीबुवा यामधील कोणते दोष वरील कथेंत स्पष्ट केले आहेत ?

(२) स्टेशनवरील वातावरण निर्माण करण्यासाठी या कथेत लेखकाने कोणकोणत्या युक्त्या योजिल्या आहेत ?

(३) मेहतर पार्सलें मागण्यासाठी येतात तेव्हाचा विनोद तुम्ही कोणत्या प्रकारांत घालाल ?

(४) तुम्ही या कथेतील संवाद तुमच्या स्नेहसम्मेलनांत किंवा दुसऱ्या समारंभांत करून दाखवा.

✦ ✦ ✦

# कंपॉझिटरचा सूड : १ :

लिंबाजी लांजेकर मुंबईला गणपत कृष्णाजीच्या छापखान्यांत कंपॉझिटर[1] होता. सासऱ्याकडून लग्नांत जो हुंडा मिळाला त्याच्या जोरावर त्यानें आपल्या मूळ गावीं, म्हणजे देवगडीं, एक लहानसा छापखाना घातला. छापखान्याला पुरेसें काम मिळत गेलें नाहीं म्हणजे छापखानदारांस नियतकालिक काढण्याची बुद्धि सुचते, त्याप्रमाणे त्यांनेंहि होऊन 'देवगड समाचार' या साप्ताहिकास त्यानें जन्म दिला. सर्व स्थानिक बातम्या देवगडसमाचारांत वाचावयास मिळत असल्यानें देवगडचे स्थानिक रहिवाशी व परठिकाणीं गेलेले रहिवासी तें विकत घेऊं लागले आणि त्याचा खप वाढत गेला. लिंबाजीरावांच्या अंगात 'टिळकीझम'चें व देशभक्तीचें वारें संचारलेलें नव्हतें; त्यामुळे देवगडसमाचारावर सरकारची कृपादृष्टि होऊन त्याला सरकारी जाहिरातींचाहि खुराक मिळूं लागला. देवगडसमाचारचा सर्व कारभार एकमुखी होता. संपादक, प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापक, मालक, कंपॉझिटर व ऑफिसबॉय — सर्व कांहीं लिंबाजीराव होते. अशा एकमुखी कारभारामुळें संपादकानें मुद्रकावर किंवा कंपॉझिटरवर मुद्रण-दोषाचें खापर फोडावयाचें, संपादकानें लिहिलेला मजकूर कंपॉझिटरनें जुळवल्यावर पुन्हा प्रुफें[3] तपासावयाचीं वगैरे प्रकार तेथें होत नसत. सगळ्या गोष्टी सुरळीत चालत. अशा प्रकारें वीस वर्षेपर्यंत मोठ्या अब्रूनें पत्र

चालवून लिंबाजीराव गावांत 'एडिटरसाहेब' म्हणून ओळखले जाऊं लागले आणि तालुका लोकल बोर्डात निवडून येऊन गावच्या 'सॅनिटरी कमिटींत' ते सरकारकडून नेमले गेले."

पण लौकरच लिंबाजीरावाच्या कीर्तिचंद्राला फिका पाडणारा बाबूराव मुलुष्टयाचा वैभवसूर्य देवगडच्या आकाशात उदय पावूं लागला. बाबूराव पदवीधर होता. पदवी घेऊन देवगडास येतांच त्याने आपल्या अप्–टु–डेट इंग्रजी पोषाखाने आणि मग असहकारी चळवळ जन्म पावताच नखशिखान्त खादीच्या कपड्यानी ग्रामवासीयांचीं मनें ओढून घेतलीं. असहकार, चरख्याची जादू, हिंदुमुसलमानांचें ऐक्य, अस्पृश्यता-निवारण इत्यादि विषयावर तो पुळणींत उभा राहून बोलू लागला म्हणजे देवगडकराना असा भास होई की, आपण प्रत्यक्ष महात्माजींचेंच भाषण ऐकत आहों! त्याच्या भाषणानी गावकऱ्यात राष्ट्रीय वातावरण खेळूं लागलें आणि एखादें राष्ट्रीय बाण्याचें वर्तमानपत्र काढण्याविषयी त्यास आग्रह होऊं लागला. त्याचा परिणाम असा झाला की, बाबुराव भिकूशेट मलुष्टे यांच्या संपादकत्वाखाली, 'कोकणपट्टींत नव्या युगाची मुहूर्तमेढ रोवणाऱ्या, स्वतंत्र राष्ट्रीय बाण्याच्या, आणि लोकपक्षाचें म्हणणें छातीठोक-पणें जगापुढे मांडणाऱ्या' चरका साप्ताहिकाचा पहिला अंक एका विजया-दशमीच्या सुमुहूर्तावर प्रसिद्ध झाला.

चरका साप्ताहिकांत स्थानिक बातम्या चुरचुरीत करून देण्यांत येत व शिवाय राष्ट्रीय विचाराचे जोरदार लेख येत. त्यामुळे त्याचा खप मोठ्या प्रमाणावर होऊं लागला. वयांत आलेला नवा गोऱ्हा जसा म्हाताऱ्या पोळास हुंदाडून शिवेपार घालवतो त्याप्रमाणे त्याने देवगडसमाचारची स्थिति करून टाकली. आपल्या खादीच्या पोतडींतील अप्–टु–डेट साहेबी सूट पेहेरून बाबुरावांनी एकदा कलेक्टर व त्यांचे चिटणीस यांच्याकडे दहापांच खेट्या घातल्या आणि 'आपल्याच पत्राचा खप अधिक होतो, त्यात आपण राजद्रोही लिखाण करणार नाहीं' अशा त्यांच्याशीं कानगोष्टी केल्या. तेव्हा, लिंबाजीरावांच्या देवगडसमाचाराच्या तोंडचा सरकारी

जाहिरातींचा घासहि बंद झाला. त्या घासावर चरका पुष्ट होऊं लागला. होतां होतां देवगडसमाचाराने एके दिवशीं डोळे मिटले आणि वीस वर्षे परिस्थितीशीं टक्कर देऊन सेवाबुद्धीने चालविलेलें समाजकार्य लिंबाजीरावांना बंद करावें लागलें. इतकेंच नव्हे तर पोट जाळण्यासाठीं बाबूरावांच्या चरका–मुद्रणमंदिरात त्या वयोवृद्ध संपादकाला खिळे जुळविण्याचें काम पतकरावें लागले. खालील मजकूर स्वत: जुळविण्याचें त्यांच्या कपाळीं आलें.

"देवगड समाचाराची इतिश्री"

येथे गेलीं तीसबत्तीस वर्षे चालत असलेल्या देवगडसमाचाराचे शेवटीं आम्हीं भाकीत केल्याप्रमाणे बारा वाजले ! 'नांव सोनूबाई नि हातीं कथलाचा वाळा' यापैकीच हा देवगडचा समाचार होता ! नवराबायकोच्या नांदुलकीच्या नोटिसा, कोठे एखाद्या कारकुड्याला नाही तर पोरेंहाक्याला मिळालेली दोनतीन टिकल्यांची बढती, बंदरात उतरलेल्या एखाद्या होडक्यातल्या तांदूळगोणाचा आकडा असल्या सटरफटर भाराभर चिंध्यांनी आमच्या या प्रगतिप्रिय शहरचा 'समाचार' कसा होणार ? बाकी त्याला माजा देवगडसमाचाराचे माजी संपादक तरी बिचारे काय करणार ! 'आधी होता वाघ्या । दैवयोगें झाला पाग्या ।। त्याचें येळकोट राहीना ।' अशी तुकारामांनी मेख मारून ठेविलीच आहे ! टाइप-जुळाऱ्याचा संपादक झाला तरी संपादकास लागणारी ती मुसंडी त्याच्या मवाळ मनांत कोठून मुसमुसणार ? धडाडी कशी धडकणार ? बाणेदार वृत्ति कशी बाणणार ? आणि आवेश कसा उपजणार ? [10]कंपॉझिटर एके कंपॉझिटर हाच पाढा कंपॉझिटर दाही कंपॉझिटरपर्यंत पढावा लागणार. माजी देवगड-समाचाराचा चाहता एखादा हरीचा लाल असलाच तर त्यास समाधानास जागा आहे की, बाबा रे, तुझ्या लाडक्या साप्ताहिकाचे कंपॉझिटर–मॅनेजर–एडिटर–प्रोप्रायटर आमच्या चरका–मुद्रण–मंदिरांत खिळे जुळविण्याकरिता राहिले आहेत. तेव्हा त्यांची सुबक व बिनचूक जुळवणूक ( तिच्यापेक्षा अधिक काय त्या चिठोऱ्यांत

स्पृहणीय होतें !) आपल्या नजरेस पूर्वीप्रमाणे दर शनिवारीं दिसेल ! देवगडसमाचार–आजोबांस हा नव्या दमाचा नवयुवक चरका साश्रु ( हे नक्राश्रु[11] नव्हेत हो ! ) नयनांनीं तिलांजलि देत आहे, व त्याच्या माजी संपादकांचें कंपॉझिटर या नात्याने सन्मानपूर्वक स्वागत करीत आहे. ''

हा मजकूर जुळवितांना लिंबाजीरावांचे डोळे ओले चिंब झाले होते. याचकाच्या आज्ञेवरून स्वत:च्या पोटच्या गोळ्यास उखळांत घालून कांडताना चांगुणेच्या,[12] मनाची जी कालवाकालव झाली असेल तीच पोटाकरिता प्रतिस्पर्धी पत्रासाठीं आपल्या पत्राच्या विडंबनात्मक मृत्यु-लेखाचे खिळे जुळविणाऱ्या, वृद्ध लिंबाजीरावांच्या मनाची झाली, यांत नवल नाहीं.

* * * *

'' बाबासाहेब, '' ( बाबूराव दोन वर्षांनी बाबासाहेब बनले ) लिंबाजी-राव विनयपूर्वक बोलले, '' एकलं का ? मी थांइच खासगी गोष्ट बोलयला मांगतों आहें. ''

आपल्या मनमिळाऊ स्वभावास अनुसरून कृपेच्या स्मिताने गाल रेषां-कित करीत बाबूराव म्हणाले, '' अलबत् बोला. लिंबाजीराव, ऑफिसचं नि प्रेसचं काम नसेल तेव्हा आपला संबध खासगीच आहे. ''

बाबूरावांच्या सौम्य उत्तराने उत्तेजित होऊन लिंबाजीराव '' अँ–माझी गंगी–काय ? '' इतकेंच बोलून घुटमळले. तेव्हा, ' यस् यस् गो ऑन,[13] घाबरूं नका ' असा बाबूरावांनीं धीर दिल्यावर त्यांनी एकदम सांगून टाकिलें, '' माझी गंगी आता मोठी झाली आहे. ''

'' एवढंच ना ? '' बाबूराव म्हणाले, '' मग काय तिलाहि नोकरीवर ठेवूं म्हणता ! तुम्हीं तिला कंपोझिंगचें काम शिकिवलं आहे म्हणे ? वा: ! नवराबायको आणखी मुलं मिळून छपाईचं काम लहान प्रमाणावर चाल-वतील तर कॉटेज इंडस्ट्रीला[14] केवढं मोठं क्षेत्र आहे ! ''

"घरकामांतहि हुशार आहे. अडीअडचणीला व्याजभात करते, म्हैशीचा शेणगोठा, दळणकांडण, शिवणटिपणं सगळयात तरबेज आहे. टकळीवर सूत काढण्यांत तर ती तालुकापरिषदेंत तिसरी आली होती."

"इतकी चागली मुलगी असण्याबद्दल तुमचं अभिनंदन केलं पाहिजे. मग काय म्हणता, तिला कंपोझिंगवेंर घेऊं ! कांही हरकत नाही. करील तुम्हालाहि जरा मदत !"

"तसं नव्हे बाबासाहेब," जरा कचरत आणि सावकाशपणें लिंबाजीराव बोलत गेले, "माझी विच्छा एवढीच आहे, की आपन गंगीला पदरात घ्यायचं कबूल करावं. आपण नव्या विचाराचे, म्हणून म्हटलं आपल्याला आधी विचारून मग आपल्या वडील मंडळींची सम्मत्ति घ्यावी. तेव्हा म्हाताऱ्याच्या डोक्यावरचं हें ओझं उतरण्याचं श्रेय घ्यावं, एवढी विनंती आहे."

"हाः हाः हाः ! लिंबाजीराव, तुम्हाला तरी बरीच थट्टा करता येते !"

"थट्टा कशी बरी करीन ? मी गरीब असलों बाबासाहेब, तरी माझं घराणं खानादानीचं आहे. आपलेच मावसे देऊळवाड्यात राहातात, त्यांच्या भावाला माझी मामेबहीण दिली आहे. आमचं लाजेकराचं घराणं नामांकित आहे."—म्हातारा लीनतेने बोलला.

"काय म्हणता लिंबाजीराव," बाबूराव उपहासाने ओरडले, "तुम्ही माझे मामा होऊ पाहाता ? अन् त्या शेंबड्या परकऱ्या पोरीशीं मी लग्न करूं ! हाः हाः हाः ! राव, तुम्हाला खुळयाच्या दवाखान्यात पाठवलं पाहिजे. आणखी हें पाहा लिंबाजीराव, मुलींचं लग्न करणं म्हणजे सोपी गोष्ट नाही. हजार नाही तरी गेला बाजार पाचसहाशे रुपये तरी हुंडा द्यावा लागेल, तेवढी आहे तुमची तयारी ?"

"बाबासाहेब, मी गरीब माणूस. माझ्यापाशी पन्नाससाठ पण गावायची मारामार तर पाचसहाशे कुठले ? परवाच आपण चरक्यात हुंड्याविरुद्ध अग्रलेख लिहिला, आता तो प्रत्यक्ष उदाहरणानं सिद्ध करून दाखविणार नाही का ?"

"पुरे करा लिंबाजीराव, तीं पुराणांतलीं वांयंगीं पुराणांत राहिलीं. आणखी स्पष्ट बोलतों, राग येऊं देऊं नको. आपल्या तोलाच्या माणसांशीं सोयरिकीची गोष्ट करावी; तुम्ही माझे नोकर आहां हें ध्यानांत असूं द्या. आपली पायरी ज्यान् त्यान् ओळखून असावी हें बरं. या आता." —बाबूराव सिगारेटचे झुरके घेत तिरस्काराने म्हणाले आणि त्यांच्या शब्दांपेक्षा त्यांच्या बेदर्कारीने सिगारेटचे झुरके घेऊन लिंबाजीरावाकडे पाहाण्यांत इतकी तुच्छता भरली होती की, बिचाऱ्या त्या म्हाताऱ्याच्या छातींत तीर घुसल्यासारखी वेदना झाली.

लिंबाजीरावांस रात्रीं जेवण गेलें नाही कीं झोपहि आली नाही. सारखे सूडाचे विचार त्यांच्या डोक्यात घोळून त्यास तळमळावयास लावीत होते.

"आपण या शिखानष्ट[१६] बाब्याचा सूड कां न घ्यावा? आपला जगप्रसिद्ध देवगडसमाचार बुडवून त्या हरामखोराने आपल्याला नोकरी करण्यास लाविलें. आपलें पुढारीपण हिरावून घेऊन सॅनिटेशन-बोर्डाचें आणि तालुका-बोर्डाचें सभासदत्व नाहीसें केलें, आणि सरतेशेवटीं आपल्या गंगीला 'शेंबडी पोर' म्हटलें—(आणखी तिचें नाक किती तरी स्वच्छ असतें!)—आणखी सटवीच्याने पाहिलें तरी कसें खोचून? अरे हलकटा, तुला या देवगडातून गाशा गुंडाळून पळ काढायला लावणार नाही, तर हा लांजेकराच्या कुळांतला बच्चाच नाही! सूड—सूड!" अशी प्रस्तावना करून ते पडल्या पडल्या सूडाचे उपाय योजूं लागले.

सूडाच्या बऱ्याच कल्पना मनांत आणून त्यांनी एक योजना नक्की केली, तेव्हा कोठे त्यांना जरा पहाटेची साखरझोप मिळाली.

* * *

सकाळीं उठून ते छापखान्यांत गेले तेव्हा पाहातात तों बाबूराव मोठया गडबडींत होते. त्यांनी लिंबाजीराव येताच म्हटलें, "तुमचीच वाट बघत होतों. हें पाहा, आज पुष्कळ काम आहे. तेव्हा बाळू सुर्व्याला जॉबवेर्र बोलवा, आणखी त्याच्या मदतीन् काम पुरतं करा. मी आत्तां तालुका

काँग्रेस कमिटीच्या कामावर आचऱ्याला जातों आहे. रात्रीं आठपर्यंत परत येईन. रात्रीं प्रुफं तपाशीन नि फायनल ऑर्डरं देईन रात्रीच्या रात्रीं. दुरुस्ती नि छपाई होऊन सकाळीं पेपर नियमित निघाला पाहिजे."

"बरं आहे काळजी करूं नको."–लिंबाजीरावानी आश्वासिलें.

लिंबाजीराव जरा घुश्शात असतील असें बाबूरावास वाटलें होतें; परंतु ते खुषींत आहेत असें पाहून त्यांस समाधान झालें. "आणखी हें बघा, ही त्या पाड्डू गध्याची लग्नचिठ्ठी कंपोज करून प्रुफ काढून ठेवा नि ही मालवण म्युनिसिपालिटीची एक नोटिस छापून टाका. हेगडेसाहेबांनी प्रुफ-दुरुस्ती केली आहे म्हणून मी न पाहातांच फायनल ऑर्डर देऊन टाकली आहे. करेक्शनबरहुकूम[१९] छापा. मी जातों, बरं का?" असें त्यांस बजावून व बूगाव निघून गेले. त्यांनी बोलताना आपली आरशी (चष्मा) मेजावर काढून ठेविली होती; ती ते बरोबर घेण्यास विसरले.

आरशी राहिलली पाहून सूडाचें भीषण हास्य करीत "देव पावला" असें म्हणून लिंबाजीरावांनी ती जवळ असलेल्या एका उंदराच्या बिळांत टाकून दिली. मालकाच्या हुकुमाप्रमाणे बाळू मुर्ग्याची मदत घेऊन म्हाताऱ्याने दिवसभर सगळें कंपोझिगचें काम संपवून टाकिलें. बाबूराव सध्याकाळीं परत आले. रात्रीं त्याच्या मेजावर प्रुफें ठेवून तीं तपासण्याची विनंती त्याच्या कपॉझिटरने केली. प्रुफें हातात घेऊन बाबूराव म्हणाले, "अरे हा लिंबाजीराव, माझी च्याळशी मी इथ विसरलों. तुम्हांला गावली[२०] का?"

"नाऽऽय!" म्हातारेबुना लांब हेल काढून म्हणाले, "आठवती आहे का कुठ ठेवली तें? खिशातच ऱ्हाली असेल."

"नाही हो. मला इथून तरीत पाय ठेवल्यावर आठवण झाली पण खिशांत गावली नाही." असें म्हणून बाबूरावानी मेजाच्या खणांत खिळे जुळणीच्या 'केसा'त[२१] व अशा जुजबी ठिकाणीं दिवा घेऊन आरशीचा शोध केला, परतु ती सापडली नाही. तेव्हा आरशीचा शोध सकाळीं उजेड पडेपर्यंत तहकूब ठेवून प्रुफं तशीच अधोंध नेत्रानी तपासण्याचें बाबूरावानी ठरविलें.

" दुरुस्ती काळजीपूर्वक होऊं दे. मला आता म्हातारपणान् चांगलं दिसत नाय म्हणून सांगतों. भलतीच चूक राहून जायची ! " – लिंबाजीरावांनी बजाविलें.

त्यांच्या रचनाकौशल्यावर अनुभवाने पूर्ण विश्वास बसलेल्या बाबूरावांनी अर्धोध नेत्रांनीच प्रुफें तपासून छापण्याची ऑर्डर दिली.

" छापूं ना ? मग कांही वांधा निघायचा नाही ना ? नाही तर मला म्हणाल, माझी आरशी–"–लिंबाजीराव.

" पुरे हो तुमची टकळी ! छापून काढा सगळं रात्रींच्या रात्रीं ! " –बाबूराव.

रात्रीं जागरण करून चरक्याचा अंक नेहमीच्या नियमितपणाने लिंबाजीरावांनी वाटावयास पाठविला. लग्नचिठ्ठया, आणि मालवण म्युनिसिपालिटीची नोटिसदेखील बंडलें बांधून मालकांकडे रवाना झाली.

* * * *

बाबूरावानी सकाळीं स्टोव्ह पेटवून स्वतःच चहा करून घेतला व तो पीत पीत, " अरे, बाब्या ! चांगला गंगीच्या ऑफरचा[२२] स्वीकार केला असतास तर हातान् च्या करायला कशाला लागता ? " अशी स्वतःची थट्टा केली. चहा पिणें झाल्यावर ते कपबशा विसळून फळीवर ठेवितात तोंच मालवण म्युनिसिपालटीचे उपाध्यक्ष रा. हेगडे हातात दोनतीन छापील कागद घेऊन तेथे आले व हसत हसत म्हणाले, " काय मिस्टर मलुष्टे ? तुम्हीं बरीच गंमत केली आहे या जाहिरातींत ! काय समजलेत ? हो तशीच वाटून टाकणार होतों, पण सहज अगोदर वाचून पाहिली म्हणून बरें झालें, काय समजलेत ? "

" काय आहे गंमत बघूं[२३] पैरेंती ! आमचे कंपॉझिटर म्हणजे शुद्ध नंदीबैल असतात, केधी डोसकं लढवायचं नाहीत. "–बाबूराव उत्तरले.

" मला वाटतें या वेळीं त्यांनी डोस्कें वाजवीपेक्षा ज्यास्ती लढविलें आहे, काय समजलेत ? " हेगडेसाहेब ती जाहिरात बाबूरावांच्या पुढे धरून म्हणतात, " ही पाहा नोटिस कशी छापली आहे ! हः हः ! "

बाबूरावांनी नोटिस वाचून पाहिली, ती खालीलप्रमाणे होतीः—

## जाहीर खबर

तमामशब्दतोडणें लोकांस कळ ( एकशब्द ) विण्यांत येतें की, मालवण येथे पटकीचा कौसांत Cholera चा उपद्रव झाला आहे. हा शब्द तोडून रोग सौसर्गजन्य वाटोळा कौस [Contaguous] असल्याने सर्व लोकांस कळविण्यांत सर्व लोकांस येतें ( शब्द गाळणें पुनः छापले गेले आहेत ) पाणी गाळल्याशिवाय पिऊन ये. तसेंच रोग्याच्या. पूर्णविराम नको आंगावरचे कपडे आठ दिवस उन्हांत ठेवल्यावाचून वापरून येत. रोगाचें चिन्ह दिसतांच आपल्या डाक्टरचा [illegible] घ्यावावा म्युनिसिपल दवाखान्यांत जावें. म्युनिसिपालिटीतर्फे फुकट औषधोपचाराची सोय केली आहे.

का टिंच य टिंब हेगडे
व्हाइस प्रेसिडेंट, मालवण
म्युनिसिपालिटी
ता. ३०।२।२८

येथे तारीख पाहिजे. प्रुफ लौकर धाडणें. मला परत जाणेची घाई आहे. ५०० प्रती काढा.

नोटिस पाहातांच बाबूरावांचें पित्त खवळलें ते रागाने ओरडले, "लिंबाजी, इकडे या!" डोळ्यांस चार आणेवाला चष्मा, डाव्या हातांत टाइप जुळविण्याची चौकट व उजव्या हातांत चिमटा अशा थाटाने लिंबाजीराव मालकांपुढे आले व चिमटा कानावर ठेवून त्यांचें भाषण ऐकू लागले. "लिंबाजी! काय ही नोटिस? बघा कशी चनकुफासारखी छापली आहे!" – त्यांच्याकडे आपण वाचीत असलेली नोटिस फेकून बाबूराव म्हणाले.

"बाबासाहेब, मी तर फायनल आर्डरबरहुकूम छापलं आहे. त्यांतून एकांदी चूक रहाली असेल."–नोटिशींतील मजकूर वाचीत लिंबाजीराव पुटपुटले. मग टाइप जुळण्याच्या खोलींत जाऊन फायनल ऑर्डरचें प्रुफ घेऊन येतांना ते मध्येच थबकून म्हणाले, "अरे हें काय चकाकतं आहे

## जाहीर खबर

शद्ध करणें  नमामलोकाम कळ विण्यांत येतें की, मालवण एक शद्ध
कोसांत  येथे पटकीचा cholera चा उपद्रव आला आहे.
शद्ध ठेवून  हा रोग सांसर्गजन्य (contaguous) असल्याने  वारोखा कोस
(शद्ध करणें  सर्व लोकास कळविण्यात सर्व लोकांस येतें, पाणी
पुन: छापले गेले आहेत)  गाळल्याशिवाय पिऊन ये. तसेंच रोग्याच्या आंगा-  पूर्णविराम नको
वरचे कपडे आठ दिवस उन्हांत टेवल्यावाचून
वापरून येत. रोगाचे चिन्ह दिसतांच आपल्या
असरें दुरुस्ती करा  डॉक्टरचा सल्ला घ्यावा वा म्युनिसिपल दवाखान्यात
जावे. म्युनिसिपालटीतर्फे फुकट औषधोपचाराची
सोय केली आहे.

का. य. हेगडे  टिंब
व्हाइस प्रेसिडेंट, मालवण
म्युनिसिपालिटी

येथे तारीख पाहिजे.  ता. ३०-२-२८

प्रुफ तैयार धाडणें.
मला परत जाणेची घाई आहे.
५०० प्रती काढा.
[illegible]

प्रुफदुरुस्तीचा मासला

उंदराच्या बिळांत! हॉं, तात्यासाहेबांची चाळशी पळवली होतीस काय मेल्या! तात्यासाहेब, हां घ्या तुमची चाळशी, उदरान् पळवली होतीन्!"

आरशी थँक्यू-पूर्वक डोळ्यांस चढवून फायनल ऑर्डरच्या प्रुफांवरून नजर टाकून बाबूराव म्हणाले, "हें काय हो, तुम्हांला दिलेल्या इन्स्ट्रक्शन्स" तशाच लाटून दिल्यात?"

"बाबासाहेब, इंस्त्रक्षणं वाटोळी वर्तुळं काढून त्यांत घालायची असतात; त्याशिवाय आम्हांला तरी मजकूर कोणचा नि इंस्त्रक्षणं कोणचीं तें कसं समजाव?"—लिंबाजीराव.

राजश्री हेगडे चिडून बोलले, "हें तुमचें प्रेसचें शास्त्र आम्हांला काय माहीत? तुम्हीं आपलें डोकें खर्चायला हवें होतें! काय समजलेत!"

"खरी गोष्ट"—बाबूराव दुजोरले.

"एखांद वेळ आम्हीं डोकं खर्च केलं म्हणजे तिकडून मालक संतापतात; आता या वेळीं यंत्रासारखं दोरीसूत काम केलं तर तिकडून गिऱ्हाईक डाक्यांत राख घालतं. मिळून मुरदुगाला दोन्हीकडून थापा!" —लिंबाजीराव कुरकुरले.

"अहो पण लिंबाजी, तुम्हीं एकदा एडिटरच काम केलं आहे; तेव्हा जरा तरी बुद्धि वापरायला नको होती का?"—त्याच्या मालकानी विचारलें.

"आमचं काय बाबासाहेब! आमच्या अगांत ती मुसंडी, ती धडाडी, तो आवेश असता तर एडिटरचे कंपाझिटर कस झालों असतों! आम्ही आपले कंपाझिटर एके कंपाझिटर, नि कंपाझिटर दाही कंपाझिटर!" —देवगडसमाचाराच्या इतिश्रींतल्या संपादकीय मुक्ताफळाची पुनरावृत्ति करीत लिंबाजीराव खवचटले.

"बरं बरं, जा, कामला लागा." असें लिंबाजीरावांवर खेकसून रा. हेगड्यांना गोंजारीत बाबूराव बोलले, "काशीनाथपंत, मी हें सगळं रद्द करून नोटिस पुन्हा दुपारीं बोटीच्या वेळेपर्यंत छापून देतों. रागावूं नका हं."

जरा शांत होऊन रा. हेगड्यांनी तेथे संपादकीय मेजावर आपलें आसन टेकिलें व ताज्या आलेल्या एका साप्ताहिकांतील चित्रें पाहाण्यास पुरवणींत तोंड खुपसलें. तोंच एक लठ्ठसा मनुष्य तेथे आला. त्याचें काळेंभोर स्थूल शरीर, खादीच्या मांडीपंचाने व डोक्यातोंडावरच्या केसखुंटांनी खुलून दिसत होतें. आपल्या हातातील जाड सोटा भुईवर आपटून त्या आवाजाने आपल्याकडे खोलींतील दोन गृहस्थांचें लक्ष ओढून घेऊन तो ओरडला, "काय रे, हाच का तो बाबू मलुष्ट्याचा चरका? रांच्या, तुझं टकुरं फोडून टाकतों, खोट्टं लिहून पत्र खपवावयास पाहातोस होय ?"

बाबूराव घाबरत घाबरत उठले व त्यास समजावूं लागले, "अहो मामा, असे रागावूं नको. आम्ही जें ऐकतों तें लिहितों. चुकलं असलं तर सांगा, म्हणजे पुढल्या अंकांत चुकीची दुरुस्ती प्रसिद्ध करूं. काय चूक आहे ती दाखवा तं खरी !"

मामांनी खिशांतून चरक्याचा ताजा अंक काढिला व त्या प्रतींतील हरवृत्तांतल्या एका बातमीवर लाल शाईने खूण केली होती, तो भाग बाबूरावांस दाखवून म्हटलें, "वाचा हें आपलं शाणपण !"

बाबूरावांनी वाचलें,

येथील भांडणांचे व्यापारी रा. मामा सुर्वे याच्या मुलीचें लग्न मुसाकाजी येथील पडावाचे मक्तेदार हाजीसाहेब शिवलकर यांच्या वडील चिरंजिवाशीं झालें. विवाहसमयीं वधूचें वय १४ वर्षांचें असून वराचें ६० वर्षांचें होतें. आम्ही वधुवराचें अभीष्ट चिंतन करितों.

हा मजकूर वाचून बाबूरावानी पुन: लिंबाजीरावास बोलावलें व "शिष्या पराधात् गुरोर्दण्ड:"[२५] असें पुटपुटून लिंबाजीराव येतांच त्यांस त्या चुकांचा जाब विचारिला. उत्तर न देतां लिंबाजीरावांनी चरक्याचें फायनल प्रुफ दाखविलें. त्यांत हाजीसाहेब, ६०, व चिंत न करितों, या चुका दुरुस्त

केलेल्या नव्हत्या. " माफ करा मामा, काल माझी आरशी सांडली होती, त्यामुळं या चुका सुधारायच्या रहाल्या—" ते सांगूं लागले.

छापखान्यात मजकूर लिहिणारा वेगळा व जुळविणारा वेगळा असतो, त्यांत प्रुफ नांवाची चीज असते इत्यादि माहिती नसल्याने मामांचें समाधान बिलकूल झालें नाही. ते आपला सोटा उगारून म्हणाले, " अरे रांड्या बाळ्या ! दाजीसाहेबाबद्दल हाजीसाहेब लिवून मीं आपली मुलगी मुसलमानाला दिली अस पसरायला बघतोस ? आणखी नवऱ्या मुलग्याचं वय ३० असून तें ६० छापून मी म्हाताऱ्याला मुलगी दिली अशी बातमी पसरतोस होय ? आणखी मला भांड्यांच्या व्यापाऱ्याऐवजी भांडणांचा व्यापारी बनवतोस होय ? मी काय वकील आहे भांडणांचा व्यापार करावयास ? चिटोळपणा[२६] करून पत्र खपवायची ही युक्ति मुंबईत साधेल पण या देवगडांत या मामाचा सोटाच बसेल पाठींत, काय समजलास ? "

" मामा, अरे काल माझा चष्मा — "—त्यांना चुचकारीत बाबूराव बोलूं लागले.

" शाबास मामा, या मलुष्टयाच्या पाठींत सोटाच हवा पाहिजे हो. " एक ब्राह्मण गृहस्थ हातांतले लग्नचिठ्ठयांचे नमुने सर्वांस दाखवीत ऑफिसांत येऊन आरडला, " अरे काय या गाढवान् आम्हांला खड्ड्यांत घातलीन् ! त्या चिठ्ठ्या पोष्टांत टाकल्या नि परगावीं रवाना दिल्यांत झाल्या. पोष्टमास्तरकडून परत घेण्याचीदिखील सोय रहाली नाय ! तो गणूभट—"

" का हो, कांही अडचणविडचण आली कीं काय ? "—विषयपालट होईल या आशेने बाबूरावांनीं विचारिलें.

" नाय रे ! तो गणुभट कसा म्हणतो, ' रे पाडोबा ' ! तर ' ओ ' तो म्हणाला, ' या लग्नचिठ्ठया की लग्नचेष्टा ? ' तशी मीं वाचून पहाल्या, तर काय भलतं छापलं आहे गाढवांनी ! अहो पाहा."— जमलेल्या प्रत्येकास एकेक चिठ्ठी देऊन तो त्यांच्या तोंडाकडे संतापाने पाहात म्हणाला. मात्र चिठ्ठया वाचणारांचे चेहरे उत्सुकता, स्मित आणि हास्य या अवस्थांतून क्रमाने बदलत गेले, तसतसा त्या गृहस्थाचा चेहरा अधिकाधिक संतप्त होत गेला. आपणहि त्या लग्नचिठ्ठीवरील मजकुराकडे डोकावूं या.

॥ श्री वाडेश्वर प्रसन्न ॥



सा. न. वि. वि.

श्रीकृपेंकरून आमचे येथे आमची कन्या सौभाग्यकांक्षिणी अंबूताई ( जाड टाइप ) इचा विवाह रविवार मिति वैशाख शुद्ध १० ( ता. १० मे ) रोजी ४ घ. ६ प. ( स्टॅ. टा. सकाळीं ७-३० ) या शुभ मुहूर्तावर करण्याचें योजिलें आहे. रत्नागिरी येथील पाजी मजूर डेपुटी कलेक्टर श्रीयुत रासभा खा गवत याचे चिरंजीव रा. माधवराव हे वर नेमस्त केले आहेत. आपल्या येण्याने मांडवाची विशेष शोभा होणार आहे. तरी सहकुटुंब सहपरिवार येऊन नग्न-समारंभ साजरा करावा अशी विनंती आहे

आपला

पांडुरंग शिवराम गध्ये.

मामांनी चिठ्ठी वाचतांना हास्याचे फवारे उडविले आणि वाचून झाल्यावर पांडोबाच्या केविलवाण्या मुद्रेकडे पाहून कष्टाने हसूं दाबलें.

रा. हेगड्यानी म्हटलें, "वा हो मलुष्टे ! आता ही तुमची लीला पाहून हसाव का रडाव तेंच उमगत नाही. काय समजलेत ? पण हें 'रासभा खा गवत' काय आहे ?"

"अहो, 'रा. सा. र. वा. भागवत' म्हणजे रावसाहेब रघुनाथ वामन भागवत. त्यांतल्या रा. सा. चा झाला रास, रवाचा झाला खा, आणखी भागवतांतल्या 'भा'नं दोहोंच्यामध्ये उडी मारली." पांडोबा गंध्ये सांगू लागले, "माजी हुजूर डेपुटीचे झाले पाजी मजूर डेपुटी; आणखी लग्नसमारंभाचा झाला नग्नसमारंभ. याच्या छापखान्यांत चिठ्या छापायला देणारा गंध्ये तर अक्षरशः गद्धा ठरलाच आहे ! आता या असल्या चिठ्या रवाना होऊन चुकल्या ! आख्खं जग माझ्या तोंडांत शेण

घातल्यावाचून राहील काय ! आणखी हें सारं या बाब्यामुळं ! बाब्या, घे हें बक्षीस !'' असें म्हणून पांडोबानी मामाच्या हातचा सोटा हिसकावून घेऊन बाबूरावावर प्रहार करण्याचा यत्न केला. बाबूराव शिताफीने वार चुकवून संपादकीय मेजाखाली लपले. बिचाऱ्या मेजाने उगाच दोनचार टोले खाल्ले. भलत्या लोकांना आश्रय दिल्याने स्वतःच्या प्राणांवर कसें बेततें त्याचें उदाहरण मेजाला भोगावयास मिळालें.

इतक्यात कोकिळेसारखा मंजुळ आवाज काढीत देवगड-कवि-मंडळाचे कार्यवाह कवि नंदिनीनंदन प्राप्त झाले व आश्चर्याने म्हणाले, '' अरे वा:! वकीलसाहेब, मामा, पांडाबा काशिनाथ हेगडेसाहेब, सगळेच जमले आहां. अहो की नाहो, आमच्या विद्यासेवक मंडळाबद्दल कांहीच्या बाहीच लिहिलं आहे संपादकानी ! '' एकदा नाजूकपणें खाकरून कवि इह-वृत्तातला उतारा वाचू लागले--

'' गेल्या बुधवारीं आमच्या या छोट्या पण टुमदार नगरींत एक मनोहर समारंभ झाला. पुण्याचे प्रसिद्ध कवि प्रभाकर हे हवा पालटण्यासाठी दोनतीन महिने येथे राहिले होते. बुधवारीं ते पुण्यास मेले. ( **गेले म्हणायच ते मेले** ) तेव्हा जाण्यापूर्वी त्यांस निरोप देण्याकरिता येथील विड्यासेवक— ''

'' विद्यासेवकऐवजी विड्यासेवक ही चूक नसून अप्रिय सत्यकथन आहे. ''—रा. गंध्ये यांनी शेरा मारिला.

'' ऐका गडे '' कवि पुढे वाचूं लागले—

'' विड्यासेवक मंडळातर्फे रा. मामा मुर्वे यांच्या मांडीवर पानसुपारी झाली, ( मांडीवर म्हणजे माडीवर ). समारंभास बरेच काव्योपहासक ( काव्योपासक नाही अं —' उपहासक ' ) जमले होते. मंडळाचे अध्यक्ष येथील लोकप्रिय वक्ते रा. पाडोबा गध्ये—''

''का पांडोबा, आता हा मुद्रणदोष आहे का अप्रिय सत्याचें कथन आहे!'' —हेगडयांनी टोमणा मारिला.

" गंध्ये यांनी कपिवर्य प्रभाकर यांच्या कपितेची आंग्ल कवि टेनिस यांच्या कवितेशीं तुलना केली. टेनिसने प्रभाकरावर ताण करणें ही अशक्य कोटींतली ( कोटींतली तर कोटींतली ) गोष्ट आहे असे अध्यक्ष महारांचे—"

मामा सुर्वे यांच्या मेंदूवर विशेष ढोबळ विनादलहरी आदळत असत, पण त्या मात्र इतक्या ऊर्जोनें" की हसतां हसतां ते भुईवर मटकन बसत.

" काय हो अध्यक्ष महार पांडोबा गंध्ये !"—असें बडबडत व खदखदा हसत ते खाली बसले. रा. गंध्ये मात्र संतापाने काळेनिळे झाले. 'ऐका हो', करीत कवि नंदिनीनंदन पुढे वाचूं लागले—

" अध्यक्ष महारांचें म्हणणें पडलें. कपि प्रभाकर यानीं उत्तर देतांना सांगितलें की, मीं कविता लिहिण्याच्या अगोदरच त्यांचीं संस्कृत, बंगाली आणि इग्रजी भाषांत रूपांतरें झालीं. रा. प्रभाकरांच्या गमनाने येथील जनतेंत स्वेदं (खेद नाही) पसरला आहे, असें चरकाकार म्हणाले."

" बस्. पुरे आता हा चावटपणा. चल. बोल. बाबूराव, याचा सगळ्याचा जबाब देस, नाही तं मेरमेरतों चोप देतो. आता जगांत तोंड दाखवायला जागा रहाली नाय, माझ्या लग्नचिठ्यांचा असा विचका केलास..." अशा प्रकारें भाषणास आरंभ करून रा. गंध्यांनी शिष्टांस असंमत अशा वाक्प्रचारांत त्याचें पर्यवसान केलें

" काय हो, कुठ आहे तो चरक्य चा संपादक ! राच्यान् आम्हां देशसेविकांना काय भलतंच म्हणून ठवलं आहे ! तूं असशील मेल्या तिच्या पोटचा......आग लागो त्या तुझ्या लेखणीला... ... " असें बडबडत एक साडेपाच फूट उंचीची प्रचड देशसेविका ऑफिसाच्या आवारांत शिरली. तिच्या मागोमाग आणखी पांचसहा देशसेविकांचा घोळका होता. सर्वजणींच्या तोंडावर सात्त्विक संताप आणि तामसी शांतता यांची जोडी विराजमान झाली होती. आपण अहिंसेचें व्रत स्वीकारलें असल्याने चरक्याचे संपादक आपल्या हातून जीवंत राहात आहेत याबद्दल त्यांस वाईट वाटत होतें.

" काय ! काय ! काय झालं ! काय झालं !"—सर्वजण ओरडले.

" अहो व्हायचं काय ! हा लाल खूण केलेला मजकूर वाचा. "–ती प्रचंड देशसेविका चरक्याच्या अंकाची घडी वकीलसाहेबांच्या हातांत देत व भयभीत झालेल्या बाबूरावावर आपल्या नेत्रांतून अग्निवर्षाव करीत म्हणाली. वकीलसाहेबांनी तो मजकूर मोठ्याने वाचला—

## प्रभातफेरी

येथील देशसेविकामंडळाने म्याजिस्ट्रेटचा मनाई हुकूम मोडून प्रभातफेरी चालविली आहे. काल रोजीं लाठीमार झाला तरी शौर्याने देशसेवा चालविली आहे. शाबास आर्य वारांगनांनो !"

शाबास आर्य भगिणींनो ! "

" आता मात्र सीमा झाली. या तुझ्या आयाबहिणींना वारांगना नि भगिणी म्हणायला लाज नाही वाटत ! "–बाबूरावांचा कान जोराने पिळीत मामा सुर्वे म्हणाले.

" ओय् ओय् ओय् ! सोडा हो कान–' आर्य वीरांगनांनो ' असं मीं लिहून दिलं होतं हो ! या लिंब्यानं 'वी' वरची वेलांटी उडवली त्याला मी काय करूं...सोडा हो मामा "–बाबूराव किंचाळला.

" वेलांटी उडाली, तर आता गोलांटी देतों घे. " असें म्हणून मामांनी बाबूरावाचा बटुदेह उचलून पायऱ्यावरून खाली फेकून दिला. रत्नागिरी बंदरांतील पडावावर खलाशी लोक उतारूंना बोटींतून पडावावर कसे फेकून देतात हें ज्यांनी पाहिलें असेल त्यांना आमचें म्हणणें खोटें वाटणार नाही.

बाबूरावाने आपला देह उचलून पायांवर उभा केला.

एका बाजूस प्रचंड देशसेविका, मामा सुर्वे इत्यादि मंडळी आणि दुसऱ्या बाजूस देशसेविकांचा घोळका या आपल्या आपल्या जबर शत्रूंकडे त्याने भयचकित दृष्टि निमिषमात्र फेंकिली आणि वेगाने गडग्यावरून उडी मारून चरका कार्यालयातून पलायन केलें.

* * * *




“ लाज नाही वाटत ! ” बाबूरावांचा कान जोराने
पिळीत मामा सुर्वे म्हणाले.

त्याच आठवड्यांत शिवाजीरावांच्या 'देवगडसमाचारा'चें पुनरुज्जीवन झालें आणि पहिल्याच अंकांत “चरका पत्राचा ॐ फस्” या विषयावर लेख आला.

✦ ✦

## टीपा

(१) कंपॉझिटर – छापखान्यांत खिळे जुळविणारा, जुळारी. (२) टिळकिझम – लो. टिळकांची विचारसरणी. (३) प्रुफ – खिळे जुळविल्यावर

त्यांचा ठसा एका कागदावर उठवून घेतात व जुळणींत झालेल्या चुका त्यावरून दुरुस्त करतात. त्या कागदावरील ठशाला प्रुफ किंवा उपमुद्रित म्हणतात. (४) सॅनिटरी कमिटी – आरोग्य समिति. (५) ही गोष्ट लो. टिळकांच्या काळातील आहे. देशभक्तीचा जोर शिवाजीरावांनी न धरल्यामुळे त्यांच म्हणून तत्कालीन परकया सरकारने त्यांना सॅनिटरी कमिटीवर नेमलें (६) १९२० च्या सुमाराम असहकाराची म्हणजे सरकारशी सहकार्य न करण्याची म. गांधींची चळवळ जोरावली. त्या चळवळीत चरका, अस्पृश्यतानिवारण यावर भर होता. (७) पुळणी –समुद्रकाठचें वाळवट. (८) नांदलकीच्या नोटिसा – नीट नांदण्या-बद्दल सूचना. (९) वाघ्या – खंडोबाचा भक्त पागया – पागेवरचा अधिकारी. 'येळकोट' हा उच्चार खंडोबाचे भक्त तळी भरण्याच्या वेळी करतात. भावार्थ : खंडोबाचा भक्त पागेवरील अधिकारी झाला तरी रणगर्जनेऐवजी येळकोटच म्हणतो; त्याचा मूळ स्वभाव जात नाही (१०) येथे काही संपादकांच्या पुनरुक्तिपूर्ण पोकळ शैलीचें विडंबन केलें आहे (११) नक्राश्रु – खोटे अश्रु. (१२) अतिथींचे स्वागत करण्याचे ब्रीद पाळण्यासाठी श्रियाळ राजाची राणी चांगुणा हिने आपला मुलगा चिलया याला उखळांत कांडून त्याचें मांस शिजवून तें अतिथीला घातलें, अशी पौराणिक कथा आहे. (१३) गो आॅन – चालू दे. (१४) कॉटेज इंडस्ट्री – झोपडींत चालणारे असे लहान धंदे. (१५) कंपोझिंग – खिळे जुळवणी. (१६) शिवानष्ट – अधार्मिक (एक शिवी) (१७) जॉब – तात्पुरतें काम (१८) फायनल आॅर्डर – छपाईचा शेवटचा हुकूम. (१९) करेक्शन–दुरुस्ती. (२०) गावणे – सापडणे. (२१) केस– चौकट, तबकडी. (२२) ऑफर – स्वीकारावद्दल विचारणा. (२३) बघू पर ती – बघू तरी. (२४) इन्स्ट्रक्शन्स – सूचना (२५) शिष्याच्या अपराधा-मुळे गुरूला शिक्षा होते. (२६) चिटाळपणा – चावटपणा (२७) ऊर्जाने – जोराने. (२८) स्वेद – घाम. (२९) वारांगना – वाईट वागणुकीची स्त्री.

## अभ्यास

(१) लिंबाजीराव व बाबूराव यांच्या संपादकीय कामगिरीचें वर्णन करतां करतां लेखकाने वृत्तपत्रीय व्यवसायांतील कांही बिगें उघड केलीं आहेत. ती कोणतीं ?

(२) पात्रानुसार हुबेहूब भाषा वापरून प्रा. जोशी कथेंत विडंबन-पद्धतीचा विनोद साधून शिवाय वास्तव (खरेंखुरें) वातावरण उत्पन्न करतात. लिबाजी, हेडगेसाहेब, मामा सुर्वे, पांडोबा गंध्ये आणि देशसेविका यांच्या तोंडचे वैशिष्टयपूर्ण शब्द व शब्दप्रयोग हुडकून ते त्यांच्या नांवापुढे लिहा.

(३) जुळाऱ्याकडून अक्षरात फिरवाफिरव झाल्याने जो विनोद उत्पन्न होतो त्याची तुम्हांला अतिशय आवडलेली तीन उदाहरणें सांगा. या विनोदाला तुम्ही कोणत्या प्रकारचा विनोद म्हणाल ? प्रसंगनिष्ठ, स्वभावनिष्ठ की शब्दनिष्ठ ?

(४) ' कपॉझिटरचा सूड ' हे नाव या कथेला कादिलें आहे ?

(५) मुद्रणदोषामुळे जशा गमती उत्पन्न होतात तशाच त्या अशुद्ध लेखनामुळेहि होतात. तशा कांही गमती कल्पून त्यांच्या आधारें तीन चुटके रचण्याचा यत्न करा.

✦ ✦ ✦

# चहाडखोर पोपट : १० :

(भाषांतरात्मक कथा)[१]

उज्जयिनी नगरांत विशाखदत्त नांवाचा तरुण श्रेष्ठी[१] राहात असे. पित्याच्या निधनानंतर नऊ कोटी निष्क[२] संपत्ति, अनेक दासदासी, सुन्दर उद्यान, सात मजल्यांचा व चार चौकांचा भव्य वाडा इत्यादि वैभवासह त्यास प्राप्त झाली होती. त्याच्या जन्मपत्रिकेतील द्वितीय स्थानावर शुभ ग्रहांची अनुकूल दृष्टि होती. तिच्या सातव्या घरांत चन्द्र स्वस्थ वारा घेत बसला असून पहिल्या घरांतून शुक्र आपल्या दीड डोळयानें[४] त्याच्यावर शुभ दृष्टीचा मारा करीत होता, त्यामुळे त्याला अनुकूल भार्येची प्राप्ति झाली होती. त्या सुन्दर, चतुर, गुणी, मधुरभाषणी, मंजुळ-आवाजी[५] स्त्रीचें नाव पद्मावती असें होतें.

विशाखदत्त शेटीचा स्वभाव फार गोड होता, परंतु त्यात एकच खोड होती व ती म्हणजे त्याचा संशयीपणा. स्त्रियांच्या चारित्र्यावर विष पेरणारे वेताळपंचविशी, शुकबहात्तरी, पाडवछत्तिशी[६] असले ग्रंथ वाचून स्त्रीजाती-संबंधी त्याचें मन फार कलुषित झालें होतें. त्यातून जिची कांति सोन-चाफ्याच्या फुलांप्रमाणे आहे, जिचा कंठ कोकिळेसारखा आहे, जिचा केशकलाप नागासारखा आहे इ. इ.[७] अशी कांता मिळाल्याने त्याचें मन फारच शंकेखोर बनलें होतें. त्याचें लग्न होऊन एक वर्ष झालें तेव्हा कोशांबी

नगरांत तेथील राजा भद्रगुप्त याचा तृतीय विवाह वैशाखांत ठरला. वेगवेगळ्या नगरांतून दवंडी पिटण्यांत आली की, व्यापारी लोकांनी आपापलें भांडवल घेऊन कौशांबीस यावें, ब्राह्मणांनी आपली विद्या व क्षत्रियांनी शस्त्रास्त्रें व इतरांनी खराटे घेऊन यावें. सर्वांचा सत्कार होईल, कोणी हि विन्मुख जाणार नाही.

विशाखदत्ताने कौशांबीस जाण्याचा विचार ठरविला, परंतु आपण गेलों तर आपल्या स्त्रीवर नजर कोण ठेवणार? ती एकनिष्ठ राहीलच म्हणून कशावरून? कारण तारुण्य, सौंदर्य, संपत्ति यांत स्वातंत्र्याची भर पडली तर तिची बुद्धि फिरणार नाही काय? 'स्त्रीबुद्धि प्रळयं गतः' असें[९] कालिदासाने वेणीसंहारांत म्हटलें आहे नाही काय?—— काय म्हणतां, 'कालिदासाने म्हटलें नाही!' नसेल. आणखी 'वेणी-संहारांत म्हटलें नाही!' नसेल. आणखी 'कालिदासाने वेणीसंहार लिहिलें नाही!' नसेल. वेणीसंहारात नसलें तर शेंडीसंहारात असेल, आणि कालि-दासाने म्हटलें नसलें तर रामदासाने म्हटलें असेल कार्णी म्हटलें नसलें तरी काय झालें? तरी "स्त्रीबुद्धी प्रळयं गताः" हें तत्त्व खोटें होत नाही. तर मग आपण आपल्या पत्नीला कोणावर सोपवून जावें? इतर स्त्रियांचा विश्वास धरतां येत नाही, कारण 'अनृतं साहसं माया'[१०] इत्यादि गुणांनी प्रेरित * अशा स्त्रीजातीची काय खात्री द्यावी? स्त्रियांचा विश्वास धरणें म्हणजे चोराच्या हातीं जामदारखान्याचा हवाला देणें होय.

अशा विचारप्रणालिकेंत तो मग्न झाला असतां वेत्रधाऱ्याने[११] वर्दी दिली की,—'श्रेष्ठिपुत्र! ज्याचा वर्ण ग्रहण लागलेल्या सूर्याच्या कांतीसारखा आहे, ज्याचे डोळे तापलेल्या पळीसारखे झगझगीत आहेत, ज्याचे कल्ले सिंहाच्या आयाळासारखे उग्र आहेत असा एक भिल्ल आपल्या लोखंडाच्या कांबीसारख्या कठीण हातांत एक काष्ठाचा पंजर घेऊन आला आहे. त्या पिंज-ऱ्यांत ज्याचें शरीर पाचूसारखें हिरवेंगार आहे व ज्याची वाणी शुकासारखी आहे असा एक राघू आपल्या मंजुळ वाणीने सर्व उज्जयिनी नगरीचें मन हरण

* वाचकभगिनींनो! भाषांतरकर्त्यावर रागावूं नका, तो मुळाबरहुकूम तर्जुमा करीत आहे.

करीत दाईवर बसला आहे.[१२] आपली भेट घेण्याची तो भिल्ल इच्छा करीत आहे.'

'येऊं द त्याला आंत.'—विशाखदत्ताने आज्ञापिलें. ज्याचा वर्ण ग्रहण लागलेल्या सूर्याच्या कांतीसारखा आहे (विशेष वर्णन वरील परिच्छेदात पाहा) अशा प्रकारचा तो भिल्ल एका क्षणाने हातांत पोपटाचा पिंजरा घेऊन आला. 'जोहार मायबाप!'[१३] असा भिल्लाने प्रणाम केला. पोपटाने दाईच्या ज्या टोकाशीं विशाखदत्त होता त्या टोकाशीं येऊन, 'आर्य, तुमचा विजय असो!' असें म्हटलें. विशाखदत्ताला कौतुक वाटलें. 'बसा, तुमचें कल्याण असो! तू कोणत्या वंशाला पुनीत केलें आहेस?'—त्याने प्रश्न केला.

'आर्य, ज्या वंशात शुकनामा, शुकबहात्तरी इत्यादि ग्रंथात वर्णिलेले शुक उत्पन्न झाले, बाणाच्या कादंबरींत वर्णिलेला शुक ज्या वंशात उत्पन्न झाला, व्यासपुत्र शुक ज्या वंशांत उत्पन्न झाला, त्याच महाप्रसिद्ध वंशाला मी कलंकित केलें आहे. मांजरांना हाकलून देताना आमच्या नांवाचा शुक शुक असा द्विरुक्तिपूर्ण उच्चार केल्यास तीं पळून जातात. आर्य, जे वणिग्जन परदेशीं जातात त्यांच्या घरावर पहारा ठेवण्याचें काम आम्ही वंशपरंपरा करीत आलों आहों.'

पोपटाच्या मनुष्यवाणीने आश्चर्यचकित होऊन 'वाहवा, मी किती भाग्यशाली आहे. कारण की, ज्या गोष्टीची मी इच्छा करीत होतों ती स्वतः घरीं चालत आली! भिल्लपुत्रा! तूं या शुकाचें काय मोल घेशील बरें?'—तो भिल्ल निदान सहस्र निष्क मागेल असें वाटून श्रेष्ठीने विचारिलें.

'एक जुनें चिरगुट दे मायबापा आगभर! लई थंडी वाजते आमच्या पर्वतात!' भिल्ल म्हणाला.

सहस्र निष्क किंमतीचा राघू जुन्या चिरगुटावर मिळू लागला; परंतु हा सौदादेखील एकदम पटविणें श्रेष्ठीच्या जिवावर आलें. स्वभावो दुरतिक्रमः। त्याने दासास बोलावून एक जुनें धोतर आणविलें आणि तें फाडण्यास त्याने हात घातला. 'अरे मायबाप फाडूं नको, संबंध धोतर दे रे अन्नदात्या.'

'संबंध धोतर कशाला? एक लंगोटी फाडून देतों म्हणजे झालें. भिल्लांना धोतर कशाला?'

'बाप्पा घरीं पोराबाळांना पर्वताची लई थंडी लागते, त्यांना पांघरायला हवं रे!'—भिल्ल कळवळ्याने म्हणाला. तेव्हा श्रेष्ठी अर्धेच धोतर फाडून देऊं लागला. तेव्हा शुक फडफड पंख हलवून भिल्लास म्हणतो, 'स्वामी', सहस्र निष्कदेखील माझ्यावरून ओवाळून फेकून द्यावे अशी माझी योग्यता असतां, तुम्ही एका जीर्ण वस्त्रावर मला देऊन टाकण्यास तयार झाला. पण हा स्वस्त विनिमयदेखील या वणिक्पुत्राला जड वाटत आहे आणि तो जन्मस्वभावाप्रमाणे घासाघीस करीत आहे. चला एखाद्या क्षत्रियाकडे, तो तुम्हांला योग्य पारितोषिक देईल. एखादा पदार्थ फुकट मिळाला तरीहि घासाघीस करणें हा वणिग्जनांचा स्वभावच आहे.' हे शब्द ऐकून विशाखदत्त लज्जित झाला आणि त्याने उदार अंतःकरणाने सबंध धोतर भिल्लास देऊन टाकलें व शुक विकत घेतला.

* * * *

वाड्याच्या सौधावेर विशाखदत्ताची विरहिणी पत्नी पद्मावती केस मोकळे सोडून सुस्कारे टाकीत बसली होती. जवळच तिची सखी हातांत वाळ्याचा पंखा घेऊन उभी होती. पद्मावती एक दीर्घ निःश्वास टाकून म्हणाली, 'सखे वक्रमाने!'

'जी श्रेठिभार्ये'—सखी उत्तरली.

"तो मेला शुक आणून ठेवल्यापासून माझ्या जिवाला कशी मेली हुरहुर लागून राहिली आहे. मेले हे संशयखोर पुरुष आपल्या धर्मपत्नीचा संशय घेऊन क्षुद्र सेवकावर किंवा पशुपक्ष्यावर विश्वास ठेवतात आणि त्यांच्या सांगण्यावरून आपल्या विवाहित स्त्रीचा त्यागदेखील करतात! खरोखरच नको हा मेला बायकांचा परावलंबी जल्म."

'आणखी श्रेष्ठिभार्ये, स्वतः कसले वाटेल तसले थेर केले तरी चालतात त्यांना! सगळ्या मेल्या पुरुषांना क्षिप्रा नदीच्या पुरात ढकलून द्यावं!* हलक्या कानाचे नि त्याहून हलक्या मनाचे असतात मेले, म्हणून मी लग्न केलं नाही.'—वक्रमाना म्हणाली.

---

* वाचकबंधूहो, घाबरूं नका, हें एका दासीचें भाषण आहे.

'म्हणून का तूं लग्न केलं नाहीस? मला वाटलें निराळंच कांही कारण असेल!'—शेठीणबाई खोचून म्हणाल्या. 'पण काय म्हणत होतेंस? तो पोपट—त्या पोपटाची मला जळली काळजी लागून राहिली आहे. तो तिकडे आल्यावर कांहीतरी खोटंनाटं सांगेल नि त्याच्यावर विश्वास ठेवून माझा छळ होईल; नाही तर एखादी सवत घेऊन उरावर बसेल.'

"बाईसाहेब तो मेला म्हणतो कसा—'वक्रमाने, आज धनिणीनं डाळिंब आणलं आहे ना, त्यांतले दाणे घाल मला.' तशी मी त्याला दुसऱ्या डाळिंबां-तले दाणे घालायला लागलें. तसा तो म्हणतो, 'हे नकोत मला. खास धनिणी-करतां आणलेलं डाळिंबच पाहिजे, नाही तर धनी आल्यावर खोड मोडतों तुमची.' असला मेला चावट आहे. दररोज त्याला ताजीं फळं न् मिठाई पाहिजे; नाही तर म्हणतो, तुझ्या धनिणीच दैव माझ्या चोचींत आहे. मी खोटंनाटं सांगून दिलं तर तुला न् तुझ्या स्वामिनीला चंबूगवाळं आटपून जावं लागेल एखाद्या मठात श्रमणदीक्षा घेऊन!"

'आण, आण पाहूं त्या पाखराला इथं, कृतघ्न मेला. त्याची मान मुरगळून मांजराला देतें खायला.'—पद्मावतीने आज्ञा केली.

दासीने एकदोन क्षणांत राघूचा रत्नजडित सोन्याचा पिंजरा आणिला. पद्मावतीला समोर पाहातांच पोपटाने तिला प्रणाम केला. पद्मावतीने विचारिलें, 'काय पक्षिराज, कुशल आहे ना? तुला आमच्याकडील निवास सुखावह वाटतो ना? तुझ्या अन्नपाण्याची आबाळ होत नाही ना!'

'वाः आर्ये! कुशल नाही असें कसें म्हणूं. हा सोन्याचा पिंजरा जरा आधिक प्रशस्त असता, तर अधिक बरं झालं असत. माझ्या पाण्याची आबाळ होत नाही, अन्नासंबंधी आधिक काळजी घेशील तर ठीक, नाही तर तुला जड जाईल.'—पोपट उत्तरला.

"तें कसं काय? द्विजराज, मी तुला स्वतःकरिता खास आणवि-लेल्या फळफळावळीच्या बिया ठेवितें, माझ्याकरिता राधिलेल्या पक्वा-न्नाचा भाग तुझ्या पिंजऱ्यांतील वाट्यात ठेवण्यात येतो, असं असून तूं असंतुष्ट राहावंस हें आश्चर्य आहे."—पद्मावती म्हणाली.

' आर्ये, फळांच्या निरुपयोगी बिया देणं म्हणजे कांही मोठे उपकार नाहीत. डाळिंबाच्या दाण्यांतल्या, द्राक्षांतल्या, बोरांच्या, जांभळाच्या बिया मात्र पोपटाला, आणि तोच न्याय बदाम, पिस्ते, आक्रोड यांना कां लागू नये ? त्यांच्या बिया मात्र आर्येला. खासा न्याय! कालच गांधारांतले नवे आक्रोड आले, त्यांतले मला कां बरं मिळाले नाहीत ? मी यःकश्चित् पाखरूं म्हणून माझी अवहेलना आर्या करीत असेल तर तसं करणं आर्येला जड जाईल.'—ऐटीने पंख उभारून व डोळे वटारून दटावीत तो म्हणाला.

' मेल्या!, जड जाईल जड—म्हणून धाक दाखवतो आहेस, काय करणार आहेस रे आमचं भिकारड्या ? मांजरानं खाल्लं तर त्याला न्याहारीला—दिखील पुरायचा नाहीस ! बोल पाखुरड्या, तू आमचं काय करणार आहेस तें ?'—वक्रमाना रागाने म्हणाली.

तिला वेडावीत आपली मान वाकडी करून व एक पंजा वर करून पोपट म्हणाला, ' धनी आले म्हणजे तुमच्या कृत्यांचा पाढा सांगण्याची कामगिरी माझ्यावर सोपाविली आहे. स्त्रियांच्या चरित्रासंबंधी गोष्टी आमच्या घरांत वंशपरंपरा चालत आलेल्या आहेत. नांव बदलून त्याच त्या गोष्टी आम्ही सांगत असतों. आम्हांला प्रसन्न ठेवणं स्त्रियाना अपरिहार्य आहे.' मोठ्या डौलाने तो बोलूं लागला. त्याच्या बोलण्याने पद्मावतीला इतका राग आला की, तिच्या मुखकमलावर गुलाब—( अरे पण त्या वेळीं गुलाब हिंदुस्थानांत आले नव्हते, नाही का?)— तिच्या मुखकमलावर रक्तोत्पलें[१९] फुललीं.

' अरे अधमा, नीचा, कपट्या, कृतघ्ना, तुला प्रसन्न ठेवायला पाहिजे नाही का ? ' पद्मावतीने पिंजऱ्याचें दार उघडून शुकास पकडलें. शुकाने प्रथम तिला चावण्यासाठी खूप धडपड केली, परंतु तिने त्याला खुबीने पकडलें होतें. ' आर्ये, सोड मला, क्षमा कर, मी खोटें बोलणार नाही.' अशी तो विनवणी करूं लागल्याने तिचें अंतःकरण विरघळूं लागलें. तें पाहून वक्रमानेने, ' बाईसाहेब, या मेल्या ढोंग्याला अगदी सोडूं नका.' असें म्हणून पोपट हिसकावून घेतला आणि कोंबड्याची मान जशी पंचाक्षरी[२०] मुरगळतो त्याप्रमाणे त्याची मान मुरगाळून त्याचा जीव घेतला.

'आता याच्या मढ्याचं काय करावं ? माजराला घालावं कीं काय ?' —वक्रमानेने धनिणीला विचारलें.

'नको ग बाई, मेल्या बोक्याच्या पोटांतून चहाडी करणार नाही कशावरून ? त्यापेक्षा मला वाटतं '—कांही वेळ विचार करून पद्मावतीने सांगितलें, 'त्याच्या पोटात पेंढा भरून तो तसाच पिंजऱ्यांत ठेवावा, म्हणजे स्वारी आल्यावर आपला गुप्त हेर नाहीसा झालेला पाहून एकदम रागवायची, तसं व्हायचं नाही. चल तें प्रेत पिंजऱ्यांत टाकून दे. आपण आता खाली जाऊं.'

* * *

आज सकाळीं विशाखदत्त शेटी आपला पहिलाच दीर्घ प्रवास आटोपून परदेशात मोठा लाभ मिळवून परत आला होता. सकाळपासून संध्याकाळपर्यंत इष्टमित्राच्या भेटी घेण्यांत त्याचा वेळ गेला. दोन्ही वेळ मोठ्या पगती झडल्या, सर्वत्र आनंदीआनंद दिसत होता. परंतु विशाखदत्ताचें चित्त मात्र स्वस्थ नव्हतें. त्याचा गुप्त दूत जो बोलणारा शुक तो अद्याप त्याच्या दृष्टीस न पडल्याने त्याचें चित्त घोटाळत होतें. सरतेशेवटीं रात्र होऊन विश्रांतीचा समय प्राप्त झाला. सुगंधी तेलाच्या मंद प्रकाशांतून आपलें वैभव अस्पष्ट दाखविणाऱ्या आपल्या शयनमंदिरांत तो गेला. तव्हा पद्मावतीने त्याच्यापुढें पंचारति ओवाळली, परंतु तिकडे लक्ष न देता मंचकावर धाडकन् बसून त्याने विचारिलें, 'साजणी, तुझें कुशल आहे ना !'

'नाथ, आपल्यापासून वियुक्त असूनहि जितकं कुशल असणं शक्य होतं तितकं कुशल आहे, परंतु त्या महांकाळेश्वराने आजचा सोन्याचा दिवस दाखविला, आता मात्र माझ्या कुशलाला मर्यादा नाही.'

'भद्रे, तुला मी पोपट सोबतीला ठेवून दिला होता. तो एकदा मला भेटीव बरं.'

'आर्यपुत्रा, तो ह्या मंचकावर टांगलेल्या पिंजऱ्यांत आहे.' विशाखदत्ताने वर पाहिलें, परंतु पिंजऱ्यांतील हिरव्या आकृतीची कांही हालचाल दिसेना. कदाचित् रात्र पडल्याने तो झोपी गेला असेल किंवा सकाळपासून

वास्तपुस्त न केल्याने रागावला असेल असें वाटून त्याने त्याला उद्देशून म्हटलें, 'शुकराया, तुझं कुशल आहे ना ? कां बरं माझ्याशीं बोलत नाहीस ? माझ्यावर रुसला नाहीस ना ? अरे, पण हा बिलकूल हालत नाही. काय बरं कारण असावं ? (पिंजरा हातांत घेऊन) अरे, हें मी काय पाहात आहे !'



" दम धर. ज्या हातांनी तूं त्याचा वध केलास ते हात या खड्गाने कापून टाकतों. "

'महाराज, हें आपल्या पोपटाचं पेंढा भरलेलं शरीर आहे.'—अगदी शांतपणें पद्मावतीने सांगितलें.

खदिरांगाराप्रमाणे आरक्त नेत्र करून दात-ओठ चावीत डावा हात उगारून श्रेष्ठी ओरडला, 'हा दुष्टे! कुलकलंके! शेवटीं तूं आपलीं कृष्ण-कृत्यें छपविण्याकरिता माझ्या परमप्रिय मित्राचा घात केलास ना! दम धर. ज्या हातांनी तूं त्याचा वध केलास ते हात या खड्गाने कापून टाकतों आणि वैश्याचा पुत्र कोणत्याहि प्रकारें बाहुबलांत कमी नसतो असें जगताच्या प्रत्ययाला आणून देतों!' असें म्हणून त्याने पद्मावतीचे हात कापून टाकण्याच्या उद्देशाने उशाखालची तलवार काढिली. परंतु ती गंजून म्यानांत इतकी घट्ट बसली होती की कांही केल्या बाहेर निघेना. त्याचा तरवार उपसण्याचा अट्टाहास चालू असतां त्याची पत्नी म्हणाली, 'परंतु आर्यपुत्र, मजवर अविश्वास आणि या भिकार पाखरावर विश्वास ठेवण्याजोगा काय आपल्याला अनुभव आला आहे?'

'किती झाल तरी तूं स्त्री आणि तो तिर्यक्योनींतला[२] असला तरी पुरुष. तो कधी खोटें बोलणार नाही.'

'अग बाई'—पद्मावती आश्चर्याने थक्क झाल्याप्रमाणें होऊन म्हणाली, 'तर मग आपल्याविषयी त्याने जें जें सांगितलें तें खरंच वाटतं? अरेरे! मग मी उगाच त्याला मारलं! मला वाटल, तो आपली निष्कारण निंदा करतो आहे!'

'सांग, सांग पाहूं माझी काय निंदा करीत होता तो.'—तरवार उपसण्याचा नाद सोडून श्रेष्ठी उत्सुकतेने म्हणाला.

'आपल्यांला राग येणार नाही ना?'

'नाही. मात्र तूं खरें सांग, जातीवर जाऊ नकोस. नाही तर माझ्याशीं गाठ आहे.'

'ती तर कायमची आहे! या पोपटाने आपण जाऊन आठ दिवस झाल्यावर मला सांगितलें, आर्ये, तुझा भ्रतार विदिशा नगरींत निवासास आहे हें मी अंतर्ज्ञानानं सांगतों.'

'खरंच माझा निवास विदिशेस झाला होता. आणखी हें त्यानं अंतर्ज्ञानानं जाणलं ना ? अरेरे, हा अंतर्ज्ञानी पक्षी घरांत असून मी त्याला मुकलों काय ? चांडाळणी—'

'थांबा, पण नाथ, माझं ऐकून घ्या. तो मेला म्हणतो कसा, आर्ये, तुझा पति या वेळीं एका नृत्यांगनेच्या घरीं मद्यप्राशन करीत आहे ! खरंच का हो—'

विशाखदत्त चपापला. त्याला काय ठाऊक की दुसरेचे वेळीं आपल्या विश्वासांतल्या नोकराने सर्व प्रवासवृत्त बायकोला सांगितलें तें ! तो उद्‌गारला, 'अजिबात खोटं ! पण पुढे तर सांग तो काय म्हणाला तें.'

'पुढे एकदा आपण श्रावस्तीस गेला होतां ना ? त्या वेळीं त्याने मेल्याने सांगितलं की, आपण एक खोट रत्न खरं म्हणून विकण्याचा प्रयत्न केला. तें उघडकीला आलं. आणखी काय तें माझ्याने बोलवतच नाही.'—अंगावर शहारे आणल्यासारखें दाखवून ती म्हणाली.

'सांग, सांग, या लुच्च्याने आणखी काय सांगितलं ? अरे हरामखोरा !' —श्रेष्ठी रागाने डावी मूठ पोपटाच्या प्रेतावर उगारून म्हणाला.

'आणखी आपली गाढवावर धिंड'—म्याल्यासारखें करून पद्मावती म्हणाली, 'नको ग बाई ! तसेंच कौशांबीस आपण मद्यप्राशन करून राजरस्त्यावर मारामारी केली—'

'मारामारी केली हें खरं,' फुशारल्यासारखें करून श्रेठी म्हणतो,' पण ती मद्यप्राशन करून मात्र नाही. ऐसा लगावला आहे ठोसा—'

'कुणीं ?'

'त्यांनी ! त्यांनी मला ठोसा लगावला, मग मला त्यांनी लगावला, पुन: त्यांनी मला, मग मला त्यांनी, अशी मारामारी प्रेक्षणीय झाली. पण मद्यप्राशन करून नाही हो ! मी काय असा अपमान सहन करीन ?'—मारामारीची आठवण करीत श्रेष्ठी म्हणाला.

'पुढं तो म्हणाला, आपल्यांला राजसेवकांनी पकडलं, आपलं क्षौर[११] करून गाढवावर बसवून गावाबाहेर घालवून दिलं ! असं खोटंखोटं या

मेल्यानं सांगितलं. मग मला राग येणं स्वाभाविक नाही का ? होय ना ? असं खोटं बोलणारा पक्षी मीं मारून टाकला नसता तर पतीची निंदा मुकाट्यानं ऐकून घेण्याचं पातक माझ्या हातून झालं नसतं का गडे ? '

'नीचा ! घे तुझ्या चहाडखोरीचं प्रायश्चित्त !' असें म्हणून त्यानें पिंजऱ्यांतून पोपटाचें प्रेत बाहेर काढून खिडकीबाहेर भिरकावून दिलें आणि मग पद्मावतीकडे वळून वेल्हाळे ! राजसे ! साजणी ! इत्यादि लावणी वाङ्मयातील संबोधनांनी तिला आळवून तो म्हणाला, 'ज्या नीच पांखरानं माझ्याबद्दल इतक्या खोट्या गोष्टी सांगितल्या त्याच्यावर विश्वास ठेवून मी तुझ्या चारित्र्याची पारख करणार होतों. मला क्षमा कर.' असें म्हणून तो तिच्यापुढे गुडघे टेकूं लागला, पण तिने खऱ्या विनयशील आर्यस्त्रीप्रमाणे सगळा राग गिळून टाकून त्याला उठवीत 'इश्श ! नाथ, दासीपुढे कसलं दंडवत घालायचं ! ' असें म्हटलें.

'हल्ली सोनं काय भाव आहे ?'–रिकाम्या पिंजऱ्याकडे नजर टाकीत श्रेष्ठीने चौकशी केली.

◆ ◆

## टीपा

(१) ही कथा खरोखर भाषांतरात्मक नाही केवळ जुने वातावरण [illegible]र्माण करण्यासाठी तसे म्हटले आहे (२) श्रेष्ठी – शेटजी. (३) निष्क– [illegible] प्राचीन नाणे. (४) राक्षसांचा गुरु शुक्र हा एका डोळ्याने अंध होता [illegible]र्या शुक्रासारखाच शुक्र ग्रहहि आहे, अशी कल्पना करून येथे त्याला दीड डोळ्याचा म्हटलें आहे. हा पत्रिकेबद्दलचा भाग पत्रिकेवर विश्वास ठेवणाऱ्या ज्योतिषवेड्यांची थट्टा करण्यासाठी लिहिला आहे (५) मजुळ-आवाजी – संस्कृत व मराठी शब्दाचा हेंगाडा समास संस्कृतातील समासांच्या विडंबनासाठी बनवला आहे. (६) वेताळपंचविशी व शुकबहात्तरी हे ग्रंथ फार असत्

तरी त्याच धर्तीचा पांडवछत्तिशी हा ग्रंथ काल्पनिक आहे. (७) हें वर्णन म्हणजे संस्कृतांतील ठोकळेबाज स्त्रीवर्णनाची थट्टा होय. (८) भंडिक – व्यापारी माल. (९) हें अवतरण अशुद्ध आहे. (१०) अनृतं साहसं माया – खोटें भाषण, धाडस व लाघवीपणा. (११) वेत्रधारी – द्वारपाल. (१२) भिल्लाचें व पोपटाचें हें वर्णन संस्कृतांतील तसल्या वर्णनांचें विडंबन करण्यासाठी लिहिलें आहे. (१३) जोहार – महार वगैरे जाति नमस्कार करतांना जोहार म्हणतात. (१४) स्वभावो दुरतिक्रमः – स्वभाव पालटणे कठिण असतें. (१५) विनिमय – सौदा. (१६) सौध – गच्ची. (१७) श्रमणदीक्षा – संन्यासदीक्षा. (१८) द्विजराज – पक्षिराज. (१९) रक्तोत्पलें– तांबडीं कमलें. (२०) पंचाक्षरी – पांच अक्षरी मंत्राने भुतें काढणारा मांत्रिक. (२१) तिर्यक्योनी – प्राणिसृष्टि. (२२) क्षौर – मुंडन, हजामत.

## अभ्यास

(१) "चहाडखोर पोपट ही गोष्ट जुन्या पद्धतीच्या स्त्रीद्वेष्टया वाङ्मयाचे विटंबन करण्याच्या हेतूने लिहिलेली आहे." असें प्रा. जोशी एका ठिकाणी म्हणतात. प्राचीन कथावाङ्मयांत स्त्रियांच्या वागणुकीबद्दल फार संशयखोर-पणा दाखविलेला असे. या संशयखोरपणाची टर या कथेंत कमकशी उडवली आहे ?

(२) या कथेंत विशाखदत्ताच्या स्वभावातील व वर्तनांतील कित्येक अनौचित्यें लेखकाने दर्शविलेलीं आहेत. पुढील वाक्याचा सूचनेसाठी उपयोग करून तीं अनौचित्यें कोणतीं, ते सांगा :– (अ) 'स्त्रीबुद्धी प्रळय गताः' असें कालिदासाने वेणीसंहारांत म्हटलें नाही काय ? – इ० (ब) त्याने उदार अंतःकरणाने सबंध धोतर भिल्लास देऊन टाकलें. (क) दातओठ चावीत डावा हात उगारून श्रेष्ठी ओरडला, 'दम धर. ज्या हातांनी तू त्याचा वध केलास ते हात या खड्गाने कापून टाकतों आणि वैश्याचा पुत्र कोणत्याहि प्रकारें बाहुबलात कमी नसतो असें जगाच्या प्रत्ययाला आणून देतों !'. (ड) मारामारी केली हें खरं,' फुशारल्यासारखे करून श्रेष्ठी म्हणतो, 'पण ती

मद्यप्राशन करून मात्र नाही. ऐसा लगावला आहे ठोसा–' 'कुणी?' 'त्यांनी!' (इ) 'हल्ली सोनं काय भाव आहे?' रिकाम्या पिंजऱ्याकडे नजर टाकीत श्रेष्ठीने चौकशी केली. (त्याचा पत्नीबद्दल संशय व स्वतःची वागणूक हीहि विचारांत घ्या.)

(३) विशाखदत्ताप्रमाणेच पद्मावती, वक्रमाना व पोपट यांच्यांतील कांही बिंगें लेखकाने दाखविलीं आहेत. ती कोणती?

(४) या कथेंत संस्कृतांतील वर्णनशैलीचें विडंबन कोठे कोठे केलें आहे? (वरील टीपांचा उपयोग करा.) स्त्रियांच्या भाषेचें विडंबन कोठं आहे?

(५) या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे, की " अनौचित्यदर्शनाच्या शेकडो तऱ्हा आहेत. . . . कधी तें गोष्टी ज्या क्रमानं घडतात त्या क्रमांत किंवा कथनाच्या क्रमात असतें. . " असें घटनाक्रमांतील किंवा कथनाच्या क्रमांतील अनौचित्य या कथेंत बऱ्याच वेळां साधलें आहे. उदा० भिल्ल पोपटाबद्दल निदान सहस्त्र निष्क मागेल अशी अपेक्षा श्रेष्ठी करतो व मग भिल्लानें एक चिरगूट मागितल्यावर तो त्याला लंगोटी देऊं बघतो! तुम्ही असलीं आणखी उदाहरणे हुडकून काढा.

(६) प्राचीन काळचें वातावरण उत्पन्न करण्यासाठी लेखकानं कोणकोणत्या युक्त्या या कथेंत योजिल्या आहेत?